# विदुषी

महिलावर्गासाठीं पुरुषभूमिकाविरहित
विनोद व बोधपूर्ण नाटिका

लेखक :

ना. धों. ताम्हनकर



किंमत १ रुपया

स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

सप्रेम समर्पण—

माझें घर सदैव आनंदी करण्यांत जी स्वतः आनंदी आहे

त्या माझ्या प्रपंचविदुषी

सौभाग्यवतीस—

—ना. धों. ताम्हनकर.

## आभार-

माझ्या मनांत बराच काळ वावरत असलेली ही विदुषी कागदावर आणण्याचें खरें श्रेय सांगली गर्ल्स हायस्कूलच्या अध्यापिका कु. लीलाताई भडभडे व मनूताई पडळकर यांना आहे. या भगिनींचा आग्रह (किंवा हट्ट) नसता तर ही विदुषी केव्हां प्रकट झाली असती कुणास ठाऊक! ही नाटिका त्यांनीं माझ्या खनपटीस बसून लिहून घेतली आणि आपल्या शाळेच्या उत्सवप्रसंगीं आपल्या विद्यार्थिनींकडून ती रंगभूमीवरहि आणविली. त्यांचा मी कायमचा आभारी झालों आहे.

माझी ही विदुषी अखिल महाराष्ट्रीय भगिनींच्या सेवेस सादर करण्याचें कार्य कोल्हापूरच्या स्कूल ॲण्ड कॉलेज बुकस्टॉलचे धनी श्रीयुत दा. ना. मोघे, बी. ए., यांनीं शिरावर घेऊन मला उपकारबद्ध करून ठेवलें आहे. कागद आणि इतर मुद्रणसाहित्य महागच नव्हे तर दुर्मिळहि झालें आहे अशा वेळीं त्यांनी हें प्रकाशन सुबक केलें, यामुळें तर मला त्यांचे उपकार विशेषच वाटतात.

—ना. धों. ताम्हनकर.

## दुसरी आवृत्ति—

महाराष्ट्र-भगिनींनी 'विदुषी'चें भरपूर कौतुक केल्यामुळें ही दुसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग आला. त्यांच्या या प्रेमाबद्दल प्रकाशकांप्रमाणें मीही त्यांचा आभारी आहे.

ता. २०-११-४९. —ना. धों. ताम्हनकर.

# अंक १ ला

[ वेळ—संध्याकाळीं ५ चा सुमार. स्थळ:—वल्लरीबाईंचें घर. स्वयंपाकीण वारणाबाई दूध विरजण्याची कामगिरी करीत आहेत. वारणाबाईंचें वय ३५ ते ४० च्या बेताचें. पोषाख थोडासा नखरेलच. त्यांच्या गरीबीस त्यांचा थाट विसंगत दिसतो. दूध विरजतांना त्या साय खातात व एका वाटींत साय भरून ठेवतात. तोंडानें वेंकटेशस्तोत्र म्हणण्याचें काम चालू असतेंच. ]

वारणा:—( पातेल्यातून तपेलींत साय ओततांना )

धाव पाव रे गोविंदा । हातीं घेवोनिया गदा.
करी माझ्या कर्मांचा चेंदा ।
( या वेळीं सायीचा लचका तोंडांत घालून )
सच्चितानंदा श्रीहरी ॥ १ ॥

तुझीया नामाची अपरिमित शक्ति । तेथें माझीं पापें किती.
( पुन्हां साय खावून )
कृपाळूवा लक्ष्मीपती । बरवे चित्ती धरावें ॥ २ ॥

( बोटें चाटते व त्याच उष्ट्या बोटानें ताकाच्या तपेलींत बुचकळून सायीस विरजण लावते. नंतर विरजणें फडताळांत ठेवून लुगड्यास हात पुसते व साखरेचा डबा काढून सायीच्या वाटींत साखर घालते. हा सर्व व्यापार चालू असतांना तिचा स्तोत्रपाठ चालूच असतो. )

जयजयाजी निरांजना
जयजयाजी परापर गहणा
जयजयाजी शून्यातीत गहना
परसावी विज्ञापना एक माझी.

वंशी:—(वल्लरीबाईंची मुलगी. वय ७–८. फ्रॉक घातलेली. पाठीवर शेपटा सुटलेला. पुढले केस विसकटलेले. बॅग घेऊन शाळेंतून येते.)

वारणा:—(स्वगत) आल्या एकदा बयाबाई. या कार्टीला गिळायला देऊन मठांत जाईपत्तर पुराण संपायची वेळ येते. आज म्हाराज धृष्ट-द्युम्न्याची कथा सांगणार आहेत अन् लवकर यायला मुद्दाम बजावलंय् त्यांनी. पोरटी वेळेवर आली हें नशीब. (प्रकट) ताअीसाहेब, लवकर या बघूं खायला!

वंशी:—आलेंच हं काकू हात धुऊन.

वारणा:—खाणं झाल्यावर हात धुवायचेच आहेत. आगोदर कशाला हवेत धुवायला! या इकडं? (फडताळांतून बशी काढून पुढें करते.)

वंशी:—(बशी घेऊन) काय आहे हें काकू! थालीपीठ! कपाळाला आठ्या घालून व तोंड वाकडें करून) मला नको थालीपीठ काकू. मला वडी नाहीं तर लाडू द्या.

वारणा:—केलंय तें खा मुकाट्यानं. लाडू अन् वडी कांहीं नाहीं आतां.

वंशी:—नसलं तर आत्तां करून द्या मला. थालीपीठ मला आवडत नाहीं हें ठाऊक असून केलंतच का तुम्ही!

वारणा:—बोलूं नका उगीच आजीबाईगत. रोज नवा जिन्नस करून घाला म्हणून सांगून गेल्या आहेत बाईसाहेब, म्हणून केलं तर तुमची ही मिजास! वाटलं तर खा नाहीं तर बसा ओठ चाटत. दुसरं कांहीं मिळायचं नाहीं रात्रीच्या जेवणापत्तर.

वंशी:—तें कांहीं चालायचं नाहीं काकू. मला आत्तां दुसरं कांहींतरी करून दिल्याशिवाय सोडायची नाहीं मी तुम्हांला.

(तिचा ओचा धरून) द्या किहो? तुमचं काय हो जातं मी मागीन तें द्यायला?

वारणा:—तुमचे लाड करीत बसायला मला नाहीं आहे वेळ. तुमच्या नादानं मी नाचलें, तर म्हाराज एकेक डोळा हा (हातानें दर्शविते) करतील माझ्यावर.

वंशी:—पण मी तुम्हांला नाचायला कुठं सांगतेय काकू? मला कांहींतरी खायला करून द्या म्हणतेय मी. त्यांतलं तुम्ही सुद्धां खा—अन् सोडतांच थोडंच म्हणा खाल्ल्याशिवाय!

वारणा:—ताइटले! थांब धर, येऊं दे त आतां बाईसाहेब. मला काय वाटेल तें बोललीस असं सांगतें. मग बघ कशी पाठीचीं चामडीं लोळताहेत तीं. थालीपीठ खाऊन झालं म्हणजे बश्शी ठेव मोरींत आणि मग जा खेळायला. (जाऊं लागते. वंशी तिला धरते.)

वंशी:—हें हो काय काकू? द्या किहो मला खायला? (थोडी झोंबा झोंबी. त्यांत वारणाच्या हातांतली सायसाखरेची वाटी हिंदकाळून तिच्या पातळावर उडते. वारणा रागावून वंशीला ढकलते. ती कोलमडून पाट टेकून ठेवलेले असतात त्यावर आपटते. कळवळून ती गळा काढते.)

वारणा:—मस्तवाल पोरटी! करून सवरून आपणच गळा काढतेय? खासं झालं. हवंच होतं प्रायश्चित मिळायला नाहीं तरी (वत्सलाबाई वल्लरीबाईची वडील जाऊ. वय ४०-४५, पोक्त व प्रेमळ. पोषाख साधाच पण नीटनेटका. वत्सलाबाईकडे पाहतांच कुणालाहि आदर वाटावा अशी प्रसन्न चर्या.)

वत्सला:—(वंशी कळवळलेली पाहतांच कळवळून) अगबाई! हें काय! (वंशीला उठवून पोटाशीं धरून) काय ग झालं! पडलीस होय! अ-

वारणाबाई बघत राहिलांय तुम्ही! उगी ह वंशीताई, सदा धांवपळ, करतेस, म्हणून असं पडायला होतं नि लागतं.

वंशी:–( हुंदके देत ) पण मी आपणहून पडलें नाहीं काकू. मला या काकूंनीं पाड...

वारणा:–खासा कारभार! मिच्याएवढी मुलगी नाहीं अन् इतकं खोटं बोलायला येतं तरी कसं म्हणतें मी! वत्सलाकाकू, लहान पोरीला पाडणें हुईल तरी का माझ्या हातून? तुम्हीच सांगा बाई?

वत्सला:–कुणाच्या हातनं काय होईल याचा कांहीं नेम सांगवत नाहीं वारणाबाई. आतांशा एकेक गोष्टी अशा ऐकायला येतात कीं मन थक्क होऊन जातं अगदीं. कालच मी ऐकलं–इथं शिडया गणपतीच्या देवळांत एक पुराणिकबुवा आलाय. गुरुपदेश देतो म्हणे तो बायकांना. आणि त्या बायका म्हणे त्याच्याभोवती फेर धरून गाणीं म्हणतात. एवढाल्या घोडयांचा पोरीबाळीसारखा हा हादगा खरा तरी वाटेल का कुणाला?

वारणा:–सत्पुरुषांची ही निंदा होतेय हो वत्सला काकू. तुम्हाला देवधर्म अन् परमार्थ करायचा नसला तर नका करूं. पण साधुसंतांची निंदा करून पाप पदरांत बांधून घेऊं नका.

वंशी:–आमचा पगार घेऊन आम्हांला खायला सुद्धां करून देणं होत नाहीं, हें सुद्धां पापच बरं का स्वैपाकीणकाकू. हें बघ किनई ग काकू, मल थालीपीठ आवडत नाहीं. आणि परवां पोट दुखल्यापासून कडबोळीं, चिवडा, थालीपीठ असले तिखट, तळकट पदार्थ खायचे नाहींत असं डॉक्टरांनीं सांगितलंय मला. म्हणून दुसरं कांहींतरी खायला द्या म्हटलं तर या बघाच निघाल्या बघ पुराणाला. काकू, मला फार फार भूक लागलीय ग.

वत्सला:–वारणाबाई, द्याना मग कांहींतरी! दहाला जेवलेली पोर—

वारणा:–एवढा कळवळा येतोय पुतणीचा, तर न्या कीं घरीं घेऊन अन् भरवा तिला पोटभर. मला नाहीं वेळ असले सोपस्कार करीत बसायला.

मला पुराणाच्या वेळेला मोकळीक मिळालीच पाहिजे, असा करार करून घेतलाय मीं कामाला राहातांना. सख्खी आई विचारीना अन् सांगताहेत मला गोष्टी ! ( तरतरा निघून जाते. )

वत्सला:–( स्वगत ) या बायांचा हा माजुरीपणा बघितला कीं माणसं यांना ठेवून तरी कशीं घेतात हेंच कळत नाहीं ! बाहेरची प्रतिष्ठा मिळ-विण्याच्या खटाटोपांत ही घरची अप्रतिष्ठा लक्षांत येत नाहीं त्यांच्या. वारणाबाई म्हणाली तें एकापरी खरंच. सख्खी आई विचारीना—( प्रकट ) वंशी, वारणाबाईंची आर्जवं करीत बसतीस त्यापेक्षां मा कडूनच कां घेत नाहींस मागून तुला काय हवं तें ?

वंशी:–पण काकू, मा घरीं असेल तर ना तिच्याकडं मागायचं !

वत्सला:–अग पण आतां घरीं नसली तरी येईलच की अमळश्यानं. घटकाभरानं काय होतंय ?

वंशी:–घटकाभरानं तरी कशी येणार ती ? मा गावाला गेलीय्. कळलं नाहीं तुला काकू ?

वत्सला:–गावाला गेल्यात वल्लरीबाई ? कुठल्या ? आणि कधीं परत यायच्या आहेत ?

वंशी:–दर्शनपुरला गेलीय मा. कसलीशी सभा आहे म्हणे तिथं. विट-कर सबजज्जांच्या विजयाबाई नाहींत का, त्यांच्याबरोबर गेलीय मा. कधीं परत येणार आहे कुणास ठाऊक ?

वत्सला:–तुझे बापू घरीं नाहींत अन् तुला घरीं एकटी ठेवून गेली ती ! वंशी, तूं किनई, आमच्याकडेच चल राहायला. मा आली म्हणजे ये परत. चल आतांच. तुला भूक ना लागलीय ?

वंशी:–होय ग काकू, मला किनई पुष्कळ खायला दे तूं. त्या दिवशीं तूं मला वड्या दिल्याबत्यास ना तसल्या वड्या हव्यात ग मला. देतीस ?

**वत्सला**:-अग वड्या बारा महिने तेरा काळ तयार कां असतात ? पण बघूं या घरीं जाऊन काय आहे न् काय नाहीं तें. चल आपली तूं. जातांना बहिरूला सांगून जाऊं या म्हणजे झालं.

( जायला निघतात तों बाहेरून 'वल्ली, वल्लीऽय' अशा हाका ऐकूं येतात व थोड्याच वेळांत परगांवाहून आलेली वीरा प्रवेश करते. वीरा वय २२. कॉलेजांत शिकणारी विद्यार्थिनी. बदामी रंगाची गोल साडी. अंगांत कोट. पदर डोकीवरून. पायांत उंच टाचेच्या स्लिपरवजा चपला. हातांत कातडी बटवा उर्फ पर्स. )

**वीरा**:-अय्या ! वैनी तूं अन् इथं कशी ! वल्लरीवैनी कुठं गेली ?

**वंशी**:-कोण ! वीराला ! कधी आलीस ? मला भावली आणीन म्हणाली होतीस. कुठाय ? आही दे मला.

**वीरा**:-अग हो हो जरा दमानं घेशील किनई ? वैनी, नमस्कार करतें हं. ( जुन्या पद्धतीनें वाकून नमस्कार करते ).

**वत्सला**:-वीराताई, ओळखलं नाहीं मीं तुम्हांला. अन् आजच्या या थाटांत असला पेशवाई नमस्कार! बराय ना ! धाकट्या वैनीचं आग्रहाचं निमंत्रण आहे वाटतं ? बरं येतें मी आतां. उद्यां नैवेद्य करायचेत म्हणून जेवायला बोलवायला आलें होतें. पण वल्लरीबाई कुठल्याशा सभेसाठीं दर्शन-पुराला गेल्यात म्हणे. आतां तुम्ही आलांत, तुम्ही यायचं बरं का. अकराचा बेत आहे. होईल ना यायला ! ( त्यांचं बोलणें सुरू होतांच वंशी आंत जाते. )

**वीरा**:-( वत्सलाबाईच्या जवळ जाऊन आणि त्यांच्या खांद्यावर दोन्ही हात टेवून ) वैनी, समजतं हं समजतं मला हें बोलणं. रागावलीस तूं माझ्यावर वैनी !

**वत्सला**:-मी कशाला हो कुणावर रागावूं ! मला अधिकार काय राग वायचा ! अन् कारण तरी काय !

वीरा:–मोठं कारण आहे, अन् पूर्ण अधिकारहि आहे तुला रागवायला वैनी. लेकरूं रुसून दृष्टीआड गेल्यावर आईला चुटपूट लागते अन् त्याच्या हट्टीपणाचा राग येतो, तसं तुला झालंय वैनी. मी कॉलेजांतून यायचं तें तुझ्या–तुझ्या कसलं–माझ्याच घरीं यायचं हा नेहमींचा शिरस्ता मी आज मोडला अन् वल्लरीवैनींच्या घरीं आलें याचा राग आला आहे तुला, होय ना ?

वत्सला:–पण यांत बिघडलं काय ? मी तशी वल्लरीबाईहि तुमची वैनीच आहे. मी म्हातारी तर ती तरणी — तुमच्या पुष्कळशी बरोबरीची. साहजिक आहे तुम्हाला धाकटी वैनी अधिक जवळची वाटणं. शिवाय मी काय, आहे आपली एक गबाळग्रंथी जुनीपुराणी बाई. माझ्या घरांत ना खुर्ची ना टेबल. तुमच्या सुधारलेल्या आवडीनिवडीला माझ्या घरांत काय आहे जुळण्यासारखं ? इथं तुम्हाला आजच्या सुधारलेल्या थाटामाटानं राहतां येईल. साहजिकच आहे तुम्हाला इकडची ओढ वाटणं वीराताई ! तुमच्यावर–

वीरा:–"तुमच्यावर !" वैनी, कां मारते आहेस मला हे फटकारे ! नात्यानं नणंद असलें तरी मुलीसारखं वाढवलं आहेस तूं मला, आणि मला तूं 'अहो जाहो' म्हणूं नकोस असं तुला मी बजावलं आहे. तूं मला अहो म्हटलंस तर बहुमान वाटण्याऐवजीं माझा धिक्कार केलास असं मला वाटतं ग. साधं "ए वीराताई" म्हणून तूं मला हांक मारलीस म्हणजेच मला खरं समाधान वाटतं. बापूनं सुद्धां तुला 'अहो' म्हणायची बंदी नाहीं का केली ! शप्पत घातली त्यानं तुला त्याबद्दल. तुझ्या माधवला तूं 'अहो माधव' म्हणतेस ? मुरलीला तूं 'अहो मुरलीताई' म्हणून हांक मारतेस ? मग मलाच का तुला हा त्रास ! मी आज इथं उतरायला आलें म्हणून शिक्षा वाटतं ही ! (गहिंवरून) पण वैनी, मला शिक्षा करतांना तुला आनंदच होत असेल नाहीं ग !

**वत्सला**:–(तिला पोटाशीं धरून व वात्सल्यानें तिच्या पाठीवर हात फिरवीत) रागावूं नको अशी वीरातार्इ. माझ्यापासून तूं दूर सरकत चाललीस अशी शंका आली खरी मला, अन् भयहि वाटलं–पण तुझा हा लडिवाळपणा बघून– क्षमा कर मला वीरातार्इ, तुला त्रास झाला माझ्या बोलण्याचा. पण आतां चल घरींच. वल्लरीवैनी आल्यावर ये वाटलं तर इकडं.

**वीरा**:–नाहीं वैनी. मी इथं उतरायला आलें तें कांहीं कारणासाठीं आलेंय—मला इथंच राहायचंय–अधून मधून येवून जाइन मी घरीं. भाऊंना सांग मी आल्याचं अन् म्हणावं मी समक्ष सांगेन सारं कांहीं.

**वत्सला**:–बरं तर येतें मी आतां. वंशीला केव्हांची भूक लागलीय. विसरूनच गेलें मी. कळकळली असेल बिचारी भुकेनं. वंशी, ए वंशी, चलतेस ना ?

**वंशी**:–(बाहुली अन् चाकोलटचा डबा घेऊन प्रवेश करते) काकू, ही बघ अंमत. आतां किनई मी बाहुलीचं लगीन करणार! ही बघ रुखवताची मज्जा (चाकोलेटचा डबा खुळखुळते).

**वीरा**:–अग पण लग्नाच्या मुहूर्तापर्यंत टिकेल का हें ?

**वत्सला**:–चल आतां, खायला हवंय ना तुला ?

**वंशी**:–मी नाहीं येत आतां. मी आतां माझ्या या बेबीला गादी घालून निजवणार आहे (पाळणागीत गुणगुणत आंत जाते).

**वीरा**:–वैनी, वंशीचं पोट भावलीनं भरलंय. आतां ती नाहीं यायची तुझ्या बरोबर. आणि त्यांतूनही तिनं मागीतलंच खायला, तर मी देईन तिला कांहींतरी. तुला मुळींच काळजी नको आतां तिची. पण हो ग वैनी, वल्लरी वैनी कोणत्या गावाला गेलीय म्हटलंस ?

**वत्सला**:–दर्शनपूरला. कमलींशी सभा आहे, तिला गेलीय म्हणे त्या नव्या मुन्मर्‌िणबाईबरोबर.

वीरा:–दर्शनपुरला ! ( आठवल्यासारखें करून ) हं हं, तिथं थिऑसॉफिकल कन्व्हेंशन झालं असं वाचलं खरं मी कुठेसं. आमच्या प्रोफेसर चक्रपाणींच्या मिसेस पद्मिनीदेवीच अध्यक्ष आहेत. पण वैनी, थिऑसॉफिकल कन्व्हेंशनला वल्लरीवैनी ग कशाला गेलीय ? की बापू नि ती थिऑसॉफिस्ट झालीं ?

वत्सला:–मला नाहीं बाई त्यांतलं कांहीं कळत. पण नव्या मुन्सफीणबाई गेल्यात आणि त्यांच्याबरोबर ही गेली असं वंशी म्हणत होती.

वीरा:–नव्या मुन्सफीणबाई ! त्यांची नि वैनीची इतकी गट्टी कधींपासून जमली ? कशा काय बाई आहेत ग या ?

वत्सला:–तें मी तरी कसं सांगू ? पण बी. ए. कां कायसं झाल्या आहेत असं म्हणतात, अन् थाटामाटावरून श्रीमंतहि दिसतात. एकदोनदां हितंच दिसल्या होत्या, पण बोलल्या कांहीं नाहींत माझ्याशीं. वल्लरीबाईची नि त्यांची मात्र फार गट्टी जमल्यागत दिसतेय. आठ दहा दिवसांपूर्वी त्यांना कुणा नातलगाच्या समाचाराला जायचं होतं श्रृंगारपूरला, तर हीसुद्धां गेली होती बरोबर. अलिकडं पातळं नि पोलकींसुद्धां दोघींचीं सारखीं दिसतात.

वीरा:–आपल्या बायकोला नकल्या रोग जडलाय असं बापूनं लिहिलं होतं खरं एकदा. तुला एक गंमत सांगून ठेवतें बरं का वैनी, वल्लरीवैनी परत आल्यावर माझ्यासारखंच गोल नेसायला लागेल पण पदर मात्र असा न घेतां पुरुषांच्या उपरण्यासारखा गळ्याभोंवती लपेटून घेईल. मोत्याच्या कुडया फार करून दिसणार नाहींत आतां तिच्या कानांत. शिंपल्यांचे इअरिंग लोंबलेले दिसतील तुला. बांगडया राहातील कीं नाहीं याची वानवाच.

वत्सला:–कशावरून केलां आहेस तूं हा तर्क ?

वीरा:–अग वैनी, कन्व्हेंनशच्या अध्यक्ष पद्मिनीदेवींचा थाट आहे असा. मग आमची वैनी कशी राहील त्यांची नक्कल केल्याशिवाय? नकल्या रोग झालाय ना तिला! (मोलकरीण विठी डोकीवर सूट केस व हातांत एक ट्रंक घेऊन प्रवेश करते.) कोण विठे, कुणाचं ग हें सामान? पाहुणे आलेत?

विठी:–पावणं नव्हत. मालकच हैती. पण त्ये आल न्हैत, यायला लागल्यात. सामान तेवढं म्होरं आलंया. मालकीनबाई बाजारांत थांबल्यांत.

वत्सला:–इतकी कसली बाई घाई झाली होती! उद्यां बाजार पळून का जात होता?

विठी:–ह्या तुमच्या गोष्टी नव्हत वैनीबाई. कशाला उगाच डोक्सं घालतां या भानगडींत? आमच्या बाईसाहेबांना कशाला नि कवा बाजार लागल, याचा काय नेम नाय बगा. परवा येकदां मध्यानरात झाल्यावर शिनेमाहून परत येतां येतां बाजार पेठेंत घुसल्या त्या. शिनेमांत बगितलेल्या बाईवानी रिबिन का कायसं हवं हुतं त्येस्नी. पर त्या वक्ताला दुकानं कुठलीं उघडीं असायला! हवं हुतं त्यें गावलं नाय म्हनुन रातभर निज नाय लागली त्येस्नी.

वीरा:–मग सकाळीं उठल्याबरोबर बाजारांत जाऊन आणला असेल जिनस वैनींनं?

विठी:–अेक का? दोन पुडकीं आलीं अेकदम. शिनेमावालीसारख्या रिबिनी अन् आकडं घेऊन भैर पडल्यात तवर लष्करांतल्या पारशी बालिष्टराची आवा दिसली. तिच्या डोकशींत येगळंच दिसलं, त्येंबी घेतलं त्यांनीं परत जाऊन. मुन्सबीण बाअीला सांगत होत्या त्याच. त्यें अेकलं मी.

वीरा:–बरं विठे, तूं जाऊन माडीवरची खोली झाडून साफ कर माझ्यासाठीं आणि मग सोप्यावर माझा होल्डॉल अन् बॅग आहे तीही नेऊन ठेव वर.

बिठी:—त्ये करीन सारं. पन सांच्यापारी कलबांतनं आल्यावर तुम्ही अंगुळ करणार का काय त्ये सांगून ठेवा. म्हंजे तसं पानी तापवून ठेवीन.

वीरा:—तुझ्या बाईसाहेबांचा कार्यक्रम आहे वाटतं हा! कधीपासून सुरू झालाय?

बिठी:—ही विटकर मुन्सबीण हितं आल्यापासून. ती बाई करती म्हनं असं. (जाते.)

वत्सला:-एकेक तऱ्हा ऐकावी ती नवीनच. विराताई, जातें हं मी आतां.

वीरा:—थोडी थांब आता वैनी. वल्लरीवैनी आलीच आहे. तिला जेवा-यला सांगायला ना आली होतीस तूं? सांगूनच जा कीं मग.

(ए वंश! वंशा, वंशी, ए वंशू! अशा हांका मारीत वल्लरी प्रवेश करते. तिचा थाटमाट वीराताईनें वर वर्णन केलेल्या धर्तीचाच. वल्लरीचें वय २७।२८. वीरा आपला अंदाज बरोबर ठरलेला पाहून वत्सलाबाईकडे पाहून स्मित करते.)

वल्लरी:—कोण तें! वीराताई कधीं आलीस! अन् वैनींना गाईड म्हणून आणलं आहेस वाटतं? एकटीला वाट सांपडत नाहीं होय?

वीरा:—अग पण वल्ली! (या संबोधनानें वल्लरी चमकते) मी कांहीं बाहेरून नाहीं आलें. मी आज, आत्तां आलें, अन् इथं तुझ्या घरीं उतरलेंय.

वल्लरी:—मग बाई कशा तुमच्या पाटोपाठ? पाळतीवर असल्यागत! (चेहऱ्यावर नापसंती)

वत्सला:—(मनांतून संताप पण संयम) वल्लरीबाई, संशयित वागणु-कीच्या माणसावर पाळत ठेवतात. वीराताईवर पाळत ठेवायची पाळी आमच्यावर कधीं यायची नाहीं. अन् त्यासाठीं आलेंहि नाहीं मी. आम्ही एकाच वेळीं इथं आलों हा शुद्ध योगायोग. मी अशासाठीं आलें होतें, उद्यां आहे आदितवार, सुट्टी. तेव्हां वर्सांचे नेवैद्य घालायचे आहेत. त्या-साठी वंशी नि तुम्ही जेवायला या. वीराताई येईलच तुमच्या बरोबर.

वल्लरीः-( वीराकडे पाहून ) असला डिनरमधला रिलिजनपणा मला मुळीं आवडत नाहीं वीराताई.

वीराः—अग पण पुरणाच्या पोळ्या आवडतात ना ? झालं तर मग. आम्ही तिघींहि येतो हं वैनी. मी तव्यावर तूप घातलेली खरपूस पोळी सबंद खाणार उद्यां. अन् वल्ली सुद्धां दोन खाणार. जा आतां तूं वैनी. ( वत्सलाबाई जावेला कुंकू लावायला जातात. ती नापसंती दर्शविते. वत्सलाबाई अत्यंत जपून तिला कुंकू लावून आपणासहि लावून घेतात व जातात. ) बरं वल्ली,—

वल्लरीः—इश्श हें काय वीराताई ! हें कुठलं नांव काढलं आहेत नवंच !

वीराः—अग, आम्ही नव्या मुली ना वल्ली ? आम्हाला नेहमीं नवं कांहींतरी हवं. आमच्या प्रिन्सिपल साहेबांच्या मिसेस—त्यासुद्धां एम. ए. आहेत बरं कां. त्यांना मी आमच्या इथल्या गोष्टी सांगतांना थोरली नि धाकटी वैनी असं म्हटलं तर त्या किती हसल्या मला ! या विसाव्या शतकांतल्या मुलींनादेखील अठराव्या शतकांतल्या वैन्या नि वन्सं सोडवत नाहींत असं म्हणून सगळ्या मुलींत टिंगल केली त्यांनीं माझी. बरं कां वल्ली, प्रिन्सिपलीणबाई एम्. ए. आहेत त्या—त्या आपल्या नवऱ्याला चक्क दयाळ म्हणतात. अन् आपल्या राधाप्यारी नांवाच्या म्हाताऱ्या सासूला नुसतं प्यारी म्हणून बोलावतात. त्यांची वडील नणंद कमलकली नांवाची आली होती परवां, तर बाई तिला नुसतं कली म्हणाल्या, अन् त्यांनींही आपल्या या मधुमालती वैनीला मधू म्हणून हांक मारली ! ही अनौपचारिक खेळीमेळीची पद्धत मला भारी भारी आवडली. तूं मला वन्सं म्हणत नाहींसच, तेव्हां तुला नकोय कसली सुधारणा करायला. मी टाकलंय आतां ठरवून, तुलासुद्धां वैनी वैनी नाहीं कधीं म्हणायचं. तुझं नुसतं नांव अन् तें सुद्धां तीन अक्षरी लांबलचक न घेतां दोन अक्षरी वल्ली म्हणणार मी तुला. 'वल्ली' 'वल्ली' कित्तीपण छान वाटतं. आमच्या प्रिन्सिपलीणबाईंसारखं......

वल्लरी:—त्या एम्. ए. आहेत...

वीरा:—नुसत्या एम्. ए. नव्हे, तर पुढल्या वर्षी पीएच्. डी. होतील बरं कां वल्ली. अन् आजकालची फॅशन तर त्यांच्यापासूनच शिकावी. पॅरीसला गेल्या होत्या त्या आमच्या प्रिन्सिपलसाहेबांबरोबर, तर तिथले फॅशन एक्सपर्ट मुलाखतीला आले त्यांच्या. त्या आपल्या नणंदेला कली म्हणतात. मग मी कां म्हणूं नये माझ्या वैनीला वल्ली ! बाकी तुला आवडत नसलं तर म्हणेन बापडी जुनाट चालीप्रमाणं वल्लरीवैनी. म्हणूं ?

वल्लरी:—मुळींच नको मला ती मेली वल्लरी अन् वैनी. एम्. ए. झालेल्या, फिएचडी होणाऱ्या अन् फॅशन एक्सपोर्ट असल्या प्रिन्सिपालीण विदुषी वागतात तस्संच आपण वागायचं वीराताई. आपण कांहीं कुणी खेडवळ बायका नाहीं वैनी नि वन्सं करायला. तूं मला 'वल्ली'च म्हण.

वीरा:—वल्ली ! वल्ली ! खरी स्पोर्ट आहेस हं तूं. पण मला आतां चहा हवा गडे. तुलाहि हवाच असेल कीं. प्रवसांत दमून भागून आलेल्या बायका आम्ही. घरांत पाऊल पडतांच चहाचा पेला ओठाला लागायला हवा. बरं कां वल्ली, माझी एक मैत्रिण आहे. तिचे पप्पा आय्. सी. एस्. कलेक्टर आहेत. तीन हज्जार पगार आहे हो त्यांना. त्यांची बायको म्हणजे माझ्या मैत्रिणीची मम्मा अगदीं अपटुडेट बाई आहे बघ. तिचा थाट बघितला तर मक्षुम मान खालीं घालेल. तिचा अगदीं ठरलेला नियम. बाहेरून येतांच बबर्जीनं चहाचा ट्रे टेबलावर ठेवलाच पाहिजे. आधीं चहा घेईल अन् मग कपडे बदलील.

वल्लरी:—मलासुद्धां अस्सं आवडतं वीराताई. मी आतापर्यंत भीत होतें, माझ्या असल्या चहापानाला लोक नांवं ठेवतील म्हणून. पण आतां मी मुळींच पर्वा करायची नाहीं कुणाची. तीन हज्जार पगारवाल्या आयसीएस कलेक्टरची बायको वागते तश्शी मी वागणार. वारणाकाकू ! अहो वारणाकाकू ! (विठी प्रवेश करते.)

विठी:–या वक्ताला वारणाकाकू कशी गवसणार तुमाला ? ही त्यांची मठांतल्या पुराणाची वेळ.

वल्लरी:–मग तूंच कर जा पाहूं चहा. झकास झाला पाहिजे हं. दोन कप कर.

वीरा:–अन् न गाळतां किटलींतनं आण. नाहीं तर ठेवशील खीर करून. साखरसुद्धां घालायची नाहीं हं. साखर अन् दूध वेगळं घेऊन ये. आम्हांला हवं तसं मिक्स्चर करूं आम्ही. होय कीं नाहीं वल्ली ?
( विठी जाते. )

वल्लरी:–यस. व्हेरी गुड.

वीरा:–( तिच्या इंग्रजीला हंसून ) चल वल्ली आपण वॉश घेऊन कपडे बदलून येऊंया तोपर्यंत—

वल्लरी:–अग पण कलेक्टरीण बाई चहा घेतल्यानंतर मग कपडे बदलतात ना ?

वीरा:–उद्यापासून आणूं आपण हा नियम अमलांत. आज अगोदर तयारी असती तर आज सुद्धां घेतला असता अगोदर चहा. चल तर.
( दोघी हातांत हात धरून जातात. दुसरी कडून कात्री व पातळाचा एक घडपा घेऊन वंशी येते. )

वंशी:–आतां कित्ती कित्ती कपडे होतील माझ्या सोनुलीला. साड्या होतील, झंपर होतील—(विजयाबाई विटकर बी. ए. प्रवेश करतात. त्यांचा पोषाख प्रवासीच. त्यांत श्रीमंती पुष्कळ, पण त्यांना तो खुलून मात्र दिसत नाहीं. )

विजया:–काय गं करती आहेस वंशी ? कापडं कसलीं कातरत बसली आहेस ? नवं पातळ फाडलंस कीं काय तरी ?

वंशी:–मग नवं असलं म्हणून ! माला तें नवोच होतं नाहींतरी आमची मा कांहीं चिक्कु नाहीं दुसऱ्या बायकांगत. एकसारखीं तींचें तीं पातळं अन् तेच ते ब्लाऊझ झंपर कध्धी घालीत नाहीं ती. कपाटांतले दोन कप्पे तिच्या पातळांनीं, पोलक्यांनीं भरलेत. काय झालं त्यांतलं एक पातळ माझ्या बेबीसाठीं फाडलं म्हणून ? अन् तिला कळायचं दिखील नाहीं तें. परवां वारणाकाकूंनीं काय जंमत केली ठाऊक आहे का तुम्हाला विजयाकाकू ? कपाटांतलीं पातळं घेऊन तींच विकत दिली माला नव्या फॅशनची म्हणून ! विठीनं चाहाडी केली नसती, तर तिच्या लक्षांत सुद्धां आलं नसतं.

विजया:–होतं बाई असंच माझं सुद्धां. बरं पण काय करतेय तुझी मा ?

वंशी:–मला काय ठाऊक ! वीरा आत्या नी ती बोलत होत्या पलिकडच्या खोलींत मघाशी. ( वारणाक्का त्रासिक चर्या करून येते. )

विजया:–कोण वारणाबाई, लवकरसा झाला देव देव ?

वारणा:–ही चाकरी आलीय ना नशीबाला ! हिच्यापुढं काय होणार देव नि धर्म ! या बाईसाहेबांच्या खादीच्या गोमकाल्यांत मला झाला वेळ. मी मठांत जाईपत्तर आरती झाली होती सुरू. नशीब म्हणून महाराजांचा तीर्थप्रसाद तरी मिळाला,

वंशी:–आमाला खायला न देतां तुम्ही आलां प्रसाद मटकाऊन. थांबा कीं, आता माला सांगतें.

वारणा:–खुश्शाल सांगा. काय डोसकं मारणार आहेत कीं काय माझं ! येऊन जाऊन कामाला येऊं नको म्हणतील, म्हणूं देत. दहा जणं आर्जव करताहेत माझी. या विजयाबाईसुद्धां...

विजया:–काय लागतांय तुम्हीं वारणबाई पोरी ठोरींच्या तोंडाला ! जा तुम्ही आपल्या कामाला.

वारणा:–बघा कीं, (जातां जातां ) मिच्याएवढी नाहीं अन् मला दाखवतेय बाऊ. ( जाते. )

विजया:-वंशी, बघून येतेस का आई काय करतेय तें? म्हणावं मी आलेंय.

वंशी:-पण इतक्यांत आला कशा तुम्ही विजया काकू? दोघी मिळून तर आला गांवाहून. घरीं घटकाभर तरी बसलां होतां का एकट्या?

(तोंड धुऊन आरशांत बघत केसावरून कंगवा फिरवत वल्लरीबाई येते.)

वल्लरी:-कलेक्टरीण काय थाट करतीय माझ्यापुढं? ती घरीं येतांच चहा पिते एवढंच ना? उद्यांपासून मी बाहेर गेलें कीं ट्रे घेऊन दारांतच बसायला लावतें विठीला. आंगणांत चहा घ्यायचा नि मगच हॉलमध्यें पाऊल (पाहून) अय्या! विजयाबाई! कधीं आला? अन् कां हो?

विजया:-अहो घरीं गेले तर दाराला कुलूप. हे गेले असणार क्लबांत अन् मी गेलेली गांवाला. नोकर माणसं मग राहतात होय ठिकाणावर? नशीब माझं माळी तरी होता जाग्यावर. त्याला धाडलं गड्याला नि मोलकरणीला बोलवायला अन् मी आलें इकडं. आंगणांत किती वेळ उभी राहूं ताटकळत?

वंशी:-हें बघ मा, माझ्या बेबीचं पातळ. वीराआत्यानं बेबी आणलीय मला.

वल्लरी:-खरं! चैन आहे बाओ एका माणसाची. बरं तूं आंत जा बरं आपल्या खोलींत. इथं मोठ्या बायका जमणार आतां.

वंशी:-मी अिथंच बसणार आत्याजवळ. तिच्या कडनं बेबीला ब्लाऊज शिऊन घेणार आहे मी.

वल्लरी;-थोर माणसाचं ऐकावं बाओ लहान मुलांनीं. रात्रीं देओल कीं आत्या तुला काय हावं तें शिऊन. आतां थोडं स्वस्थपणानं बसूं बोलूं दे आम्हांला. जाणार ना माझी बेबी? मी एक गंमत देईन मग तुला.

वंशी:-आधी दे. मग जाईन.

वल्लरी:–( गळ्यांतून किल्यांचा गोफ काढून तिला देते ) मी ती नवी ट्रंक आणलीय ना, ती उघड. त्यांत एक पेपरबॉक्स आहे. ती घे. तुझ्यासाटीं इमिटेशन नेकलेस नि ईरिंग आणलेत मीं.

वंशी:–( आनंदानें नाचत ) मला नेकलेस, मला ईरिंग– ( जाते. )

वल्लरी:–बरं कां विजयादेवी, उद्यां जायचंच त्या फॅन्सी स्टोअरांत. आमचे हे मेले ब्राह्मण दुकानदार अगदींच रद्दी. एकाच्या दुकानांत कांहीं मिळाली नाही ती लिपस्टिक. पद्मिनीदेवींची ती विलायतेहून आलेली बहीण ! अहाहा ! काय ओठ दिसत होते तिचे ! माझे ओठ तसे कधीं रंगवीन असं होऊन गेलंय मला. ( वीरा प्रवेश करते. )

वीरा:–ए वल्ली ! होणार आहे कीं नाहीं तुझ्या विठाबाईचा चहा ? [ आंत वारणाबाईचा आवाज— ‘ अग धाड आली तुला चांडाळणी ! चुलीपर्यंत कशाला कोसळलीस ? सगळा भ्रष्टाकार केलास कीं ! ’

विठी:–तोंड वाजवूं नका उगीच. मालकिणबाईनीं सांगितलंय मला. एवढं सगळं हाय, तर त्या मटांतलं पानी कसं पितासां गटागट ?

वारणा:–मग त्याला ग काय झालं ? महाराजांचं तीर्थ आहे तें ?

विठी:–पन त्यो म्हाराज बामण हाय कीं म्हार हाय ह्यें काय ठावं तुमास्नी ?

वीरा:–अग ए बायांनो, म्हाराजाची जात कुळी मग हुडका. आगोदर चहा आणा लवकर. ( विठी ट्रेंत चहाचीं सर्व उपकरणें घेऊन येते. )

विठी:–मी तुमास्नी सप्पई सांगतु बाईसाब. या वारुबाईनं मला बोलायचं कारण नाहीं. तिचं येर चालून दिलासा, तर मी दुसरीकडं काम बघत्यें. नायतर काय ? चोरून खातांना जलम चाललाय अन् मला सांगतीया सवळयाच्या गोष्टी.

वारणाः—(रागानें येऊन विठीच्या पाठींत धपाटा घालते) मस्ती आलिय तुला चांडाळणी. कुणाला ग चोरून खाते म्हणतेस?

विठीः—(तिच्या अंगावर जाऊन) तुला तुला म्हनत्यें चोरून खातीस म्हणून. लुगडी चोरल्याचं धरून दिलं तर लाज कुठाय? कामाला आली तवां हाडुक होतं नुसतं. आतां बगा बोका कसा फुगलाय त्यो. साय अन् लोणी उमटल्याबिगार थोडंच राहातंय अंगावर?

वारणाः—अन् तूं अगदीं कानांत तुळशीपत्रंच घालून बसली असशील? डाळ तांदुळाचा डबा तीन दिवसांत मोकळा होतोय. निवडायला दिलं तर निम्मं नाहीं येत घरांत. इतकी घाण असती होय त्यांत? चोरटी मेली.

वीराः—(दोघींच्या मधें जाऊन) तुम्ही आहांत ना जिवंत? चोरटी असतील ती मरतील. वारणाबाई, सरणाऱ्याचं सरतं अन् तुम्ही कां कावतां उगीच? जा तुम्ही आपल्या कामाला. अन् तूंहि जा बघूं विठाबाई. साय लोणी संपलं तर आमची वल्ली आणतेच आहे मंडईतून. उगीच कशाला काढतां एकमेकींच्या उखाळ्या पाखाळ्या? जा तूं.

(वारणा व विठी एकमेकींकडे मारक्या म्हशीसारख्या पहात जातात. चहापान सुरू होतें.)

विजयाः—या सर्व्हंटस्च्या हातचलाखीपेक्षां भांडाभांडीनंच जीव बेजार होतो.

वीराः—अन् तुमच्यासारख्या विदुषींना जी मेंटल पीस लागते ती मिळत नाहीं अशानं.

वल्लरीः—तर काय.

वीराः—पण वल्ली, राहिलंच कीं विचारायचं. तूं आज गेली होतीस कुठं? अन् कशाला?

वल्लरीः—दर्शनपुरला थिऑसफी कन्व्हिवशन होतं त्याला गेलें होतें मी. अन् या विजयाबाई सुद्धां आल्या होत्या.

वीराः—थिऑसॉफींत बरी बाई तुला गोडी वाटायला लागली ? चांगलीं व्याख्यानं ऐकायला मिळालीं असतील नाहीं ?

वल्लरीः—( उत्तर देतांना घुटमळत ) तें कांहीं विचारूं नकोस वीराताई. या विजयाबाईच सांगतील तुला सारं. ( कप खाली ठेवून ) वंशीचं काय चाललंय तें बघून येतें हं. ( जाते. )

विजयाः—तुमच्या या वैनी म्हणजे एक और व्यक्ति आहे वीराताई.

वीराः—पण चांगली कीं वाईट ?

विजयाः—वाईट नाहींत हो तशा त्या. पण कधींकधीं जरा जास्त करतात. परवांचंच सांगतें तुम्हाला. आमच्या थिऑसॉफिकल कन्व्हेंशनच्या अध्यक्ष पद्मिनीदेवी आणि आम्ही दुसऱ्या कांहीं विदुषी डिस्कशन करीत बसलों होतों. विषय होता How to make home life pleasure-ful. रागिणीबाईंचं ओपीनियन Equality of man and woman झाल्याशिवाय तें कांहीं शक्य नाहीं. स्त्रीपुरुषांचे मार्ग एकरूप पाहिजेत हा त्यांचा आग्रह. यांतली तात्विक बाजू वल्लरीबाईसारख्या बिनशिकलेल्या बायकोला कितीशी कळणार ? पण आपल्याला कळत नाहीं त्यांत तोंड घातलं नाहीं तर वल्लरीबाई कसल्या ? स्त्रीपुरुषांना अगदीं सारखं वागतां आलं पाहिजे असं रागिणीबाईनीं म्हणतांच 'मी आतां पुरुषांसारखा सुटबूट घालून ही सुधारणा अमलांत आणून दाखवणार, नाहींतर घरच्या पुरुषांना पातळ पोलकं घालायला लावणार' असं बोलल्या वल्लरीबाई ! सगळ्या डेलिगेट बायका तोंडाला रुमाल लावून हंसायला लागल्या माझ्याकडं बघून ! माझ्याबरोबर आलेल्या ना या ! मागल्या Welfare League च्या Meeting च्या वेळींही असंच. अध्यक्ष लेडी पदमजींना मी यांची इंट्रोडक्शन करून

दिली, तेव्हां त्यांनीं 'तुमची एकादी चिल्ड्रन होम हाय काय' असं विचारलं. वल्लरीबाईनीं चक्क 'होय' म्हणून सांगितलं. अन् 'किती चिल्ड्रन हाय तुमच्या होममधी' असं त्यांनीं विचारतांच 'माझ्या होमांत एकच मुलगी आहे सात वर्षांची' असं अडाणी उत्तर दिलं! असल्या प्रॅक्टीकली इल्लिटरेट बायकांमुळं आमच्यासारख्या विदुषींची अशी कांहीं फजिती होते कीं सांगून सोय नाहीं.

**वीरा:**—पण मी तुम्हांला असं विचारतें विजयाबाई, तुम्हीं असल्या सोबतीणी नेतांच कशाला बरोबर ?

**विजया:**—मला किनई एकटीनं प्रवास करायचं जमत नाहीं. तेव्हां वल्लरीबाईसारखी हौशी सोबतीण आपण होऊन येत असल्यावर नको कशाला म्हणूं मी ? वल्लरीबाईची एक शिक्षणाची कमतरता सोडली, तर बाकी छानच आहेत हं त्या. चहा, जेवण, कपडे, वेणीफणी, असल्या गोष्टींत मला कांहीं म्हटल्या कांहीं बघावं लागत नाहीं. आधीं माझी सोय करतील अन् मग आपली. माझ्यावर त्यांचा भारी लोभ हं. तुम्हाला सांगितलं तर खोटं वाटेल वीराताई. वल्लरीबाईच्या सख्ख्या बहिणीला टायफॉईड झाला अन् घरीं तिचं करायला कुणी नाहीं तेव्हां ताबडतोब या असं पत्र आलं मेहुण्यांचं. त्याच वेळीं मला पडसं येऊन डोकं जड झालं होत. तर वल्लरीबाई कांहीं केल्या गेल्या नाहींत बहिणीकडे मला सोडून ! दिवसभर माझ्या उशागती बसून होत्या. दिवसांतनं तीनदां बाम चोळायच्या माझ्या कपाळाला.

**वीरा:**—हा वैनीचा प्रेमळपणा नसून आचरटपणा वाटतो मला! आणि रागावूं नका विजयाबाई. तुमचासुद्धां आचरटपणा ठरतो हा.

**विजया:**—माझा आचरटपणा ! ( दचकून उभी राहाते. )

**वीरा:**—बी. ए. झालेल्या तुमच्यासारख्या विदुषीला आचरटपणा चिकटवतांना मला कससंच वाटतं, पण आपलं खरं मत सांगून मोकळं

व्हायची मला संवयच लागून राहिली आहे. वैनीच्या सख्ख्या बहिणीच्या जिवावरच्या दुखण्यापेक्षां स्वतःच्या पडशाची मिजास अधिक वाटली तुम्हांला आणि मैत्रिणीकडून कुणबिणीसारखी चाकरी करून घेतली तुम्ही! तुमच्या जागीं मी असतें तर बहिणीकडं हाकलून दिलं असतं वैनीला. आणि त्यांतूनही ती गेली नसती, तर माझ्या पडशाची पर्वा न करतां मीच जाऊन शुश्रुषा केली असती बिचारीची.

**विजया:**–( मनांतून फजीत झालेली, पण वरकरणी कोडगेपणानें हंसत ) अहो, मी वल्लरीबाईंना बहिणीकडं जा म्हणून शंभरदां म्हटलं असेल—पण— ( वल्लरी हातांत अर्धवट उघडलेली ट्रंक घेऊन हंसत हंसत प्रवेश करिते. तिच्या मागून वंशी येते. )

**वल्लरी:**–ही पाहिलीत का, काय गंमत झाली ती! विजयाबाई! दुसऱ्याच कुणाची ट्रंक बदलून आलीय. माझी टॉयलेटचं सामान भरलेली नवी ट्रंक गेली.

**विजया:**–म्हणजे! पन्नास रुपयांचा तरी चट्टा बसला. शिवाय तुमची गैरसोय होणार ती वेगळीच.

**वंशी:**–( खाली ठेवलेली ट्रंक उघडून ) पण माला किती जोडे मिळालेत तें तरी बघा कीं काकू! मला नेकलेस नि इरिंग आणली म्हणून सांगितलंय अन् आपल्याला जोडे घेऊन आलीस ?

**वल्लरी:**–( ट्रंकेंतील चपला शूज वगैरे उचलून पहात व उंच टाचेचें एक मखमली चप्पल उचलून घेत ) बाकी ट्रंक बदलली तें एका अर्थी बरंच झाल्यासारखं वाटतंय मला. कनव्हिक्शनला ती वसुंधरा कीं कोणशी गुजराथी मुलगी आली होती बघा. अहो—ती—इंदिरा नेहरूबरोबरच लंडनला होती म्हणत होत्या नायका ती–तिच्या चपलासारखी चप्पल घ्यायचं

ठरवलं होतं मीं. हा जोड अगदीं तस्सा आहे नाहीं ? बघा कसा आयता घरांत आला. आमच्या गावांत कसला मिळायला बसलाय असला! (पायांत घालते) छान दिसताहेत नाहीं विजयाबाई ! तुला आवडली का वीराताई ?

वीराः—या चपला जोडयाचं मला नाहीं बाई कांहीं कळत. पण झाली ही गोष्ट मला मात्र आवडली हं. विदुषी म्हणून मिरवणाऱ्या तुझ्यासारख्या बायकांना आपआपलं सामानसुमान संभाळण्याइतकाहि शहाणपणा नसतो, हें तूं सिद्ध केलंस याचा मला भारी आनंद वाटतो. दुसऱ्या एकादीनं तेल पावडर आणि आकडे टाकून वाहाणा आणल्या असत्या तर 'गबाळी' 'वेंधळी' 'अजागळ' अशीं शंमर नांवं ठेवन घेतलीं असतीस तूं वल्ली !

वंशीः—आणि माझ्या सारख्या लहान मुलीनं ही चूक केली असती, तर झोडपूनसुद्धां काढलं असतन् मानं. बरं का ग विरात्या, परवां शाळेंत माझी ड्राइंगची नवी वही बदलून मी एक जुनी वही आणली, तर हिनं दहा तरी धपाटे घातलेन् पाठींत आणि शिव्या सुद्धां किती किती दिल्यान्. आतां मी म्हणूं का तुला 'गाढव' 'मूर्ख'...

वल्लरीः—(रागावून) फाजील कार्टी ! दम धर डागच देतें आतां तुझ्या तोंडाला. कुणाला काय बोलातं. (वंशीस धरावयास जाते ती झुकांडी देते पण टेबलखुर्चीला ठेचळून पडते. तिचें डोकें आपटून खोक फुटते व ती कळवळून किंचाळते तरीही वल्लरी तिला धपाटेच घालते.) छान झालं. म्हणशील कां कार्टे पुनः असं? (वीरा वंशीला आई-च्या तावडींतून सोडवते.)

वीराः—माणूस आहेस कीं कोण आहेस तूं? पोरीचा प्राण चाललाय अन् तूं घाल धपाटे. कशाला आई झाली आहेस तिची ! विदुषींची ऐट

बाहेर बघून घ्यावी. घरांत बघितलं तर कैदाशिणी जशा कांहीं. उगा हं वंशी—( तिच्या कपाळावरील रक्ताचे ओघळ टिपत व प्रथमोपचार करायला आंत नेते. )

विजया:—जातें आतां मी वल्लरीबाई. उद्या या हं सकाळीं— तुम्हाला गिडवाणीबाईसारख्या ओढण्या आणि लेसीस हव्या आहेत ना ? जाऊं आपण दिलखुष स्टोअरमधे.

वल्लरी:—अगदीं साडेसातला येतें. ( विजयाबाई जाते. दुसरीकडून विठी येते. )

विठी:—वीराताई, अहो वीराताई ? त्या न्हैती हतं ?

वीरा:—( लगबगीनें व चिंतातुर चर्येनें प्रवेश करते. ) वैनी ? वैनी ? आंत चल बघूं अगोदर. वंशीला भोंवळ आलीय—- तूं जाऊन बस तिच्यापाशीं.

विठी:—वत्सलावैनीकडला सांगावा हाय वीराताई तुमास्नी. वैजयन्ती अन् वेलाताई म्हणून कुनी तुमच्या वळखीच्या बाया तुमच्याकडं आल्या व्हत्या म्हणं.

वल्लरी:—कोण आहेत हो त्या ?

वीरा:—(चिडखोर स्वरांत) आहेत आश्रमपुरच्या राजकन्या. तूं पोरीकडं जा पाहूं आधी. मी डॉक्टरला आणतें बोलावून.

वल्लरी:—तुम्हीच बसा वीराताई घरीं. मी जाऊन डाक्टरना धाडतें अन् बाईच्या घरीं जाऊन तुमच्या त्या राजकन्यांना पाहून येतें. त्यांचीं पातळं बितळं झकास असतील नाहीं ! ( लगबगीनें जाते. वीरा संतापानें लाल होते. पण करणार काय ! उद्वेगानें वंशीच्या शुश्रुषेस जाऊं लागते. विठी विस्मित होते तो प्रकार पाहून. )

**वीराः**—विठे, वंशीला लागलंय. आतां डॉक्टर येतील. त्यांना उकळलेलं पाणी लागेल. आधी स्टोव्ह पेटवून आधण ठेव जलदी.

**विठीः**—लागलंय ताईस्नी? लै लागलंय व्हय? अग बाई ग! आतां करूं तरी काय म्हणतें मी? ( कळवळून आंत जाते. )

**वीराः**—विदुषीपणाचं विष अंगांत शिरलं नाहीं म्हणून तुझ्या हृदयांतली माया ममता मेली नाहीं विठे! त्या विषानं वल्लरीच्या मनांतली आई मरून गेली आहे. नशीब तिचं आणि तिच्या तावडींत सांपडलेल्या दुर्भाग्याचं!

[ पडदा. पहिला अंक समाप्त. ]

# अंक २ रा

[ वेळः—दुपारीं ३ चा सुमार.

स्थळः—पहिल्या अंकाचेंच. पण माजघराऐवजी दिवाणखाना. मधें गोल टेबल. त्यावर पुष्पपात्र. तीन बाजूस तीन खुर्च्या. एका बाजूस चौकोनी लेखन मेज. त्यावर लेखन साहित्य, आणि कांहीं इंग्रजी पुस्तकें. दुसऱ्या बाजूस आरशाचें टॉयलेटचें टेबल.

वल्लरीनें up to tomorrow फॅशनेबल पोशाख केला आहे. ]

वीराः—( अलबम्‌मधील फोटो दाखवीत. ) आतापर्यंत पाहिलंस तें कांहींच नाहीं वल्ली. आता पुढचा फोटो पाहून तूं चकितच होऊन जाशील. ( पान उलटते. )

वल्लरीः—[ पाहून ] ई ऽ ऽ! हें कोण बाई ध्यान!

वीराः—ध्यान! वाटलंच मला तूं फसणार असं वल्ली. हा फोटो कुणाचा आहे ठाऊक आहे का तुला? अग, ही डब्बल ग्रॅज्युएट मुलगी आहे. यमुना नांव आहे हिचं. आणि हिचे वडील लक्षाधीश व्यापारी आहेत.

वल्लरीः—देवानं दिलं तरी भोगायला नशीब लागतं. काय मेली ही भटाभिक्षुकाच्या पोरीची कळा! नांवापुरतीसुद्धां ब्यूटी नाहीं विचारींत! म्हणे यमुना! तरी बरं भिकी नाहीं तर धोंडी नाहीं ठेवलं नांव आई-बापांनीं! आमच्या लोकांना चांगलीं नांवंच ठेवता येत नाहींत, बायकांचीं काय नि पुरुषांचीं काय! आमच्या यांचंच बघा कीं! म्हणे बापू! कुणी कुणी सोन्याबापू म्हणून सुद्धां हाक मारतात! मला नाहीं बाई आवडत तें जुनाट चालीचं नांव. त्यापेक्षां विलास, विकास, उल्हास, सुहास, असें कांहीं तरी—

वीराः—मग कर कीं पुनः एकदां नवऱ्याचं बारसं.

वल्लरीः—इश्श, पुरे झाली थट्टा. बरं, काय सांगत होता तुम्ही यम्नाकांचं?

वीराः—सांगते तुला यमुनाचं म्हणणं काय आहे तें. ती म्हणते 'परदेशी कपड्यालत्त्यानीं नटणं हा शुद्ध निलाजरेपणा आहे. माणसानं खुलून दिसावं ते ज्ञानानं, कर्तबगारीनं.'

वल्लरीः—पडलाच आहे कीं उजेड बाईसाहेबांच्या ज्ञानानं नटण्याचा. वीराताई, पुढचा फोटो दाखवा बाई.

वीराः—हा फोटो मात्र तुला पसंत पडेल बघ वल्ली. हिचं नांव नीलांबरी. शिकलेली म्हणशील तर मॅट्रीकही नाहीं. लग्न झालंय तें सुद्धां शंभर दीडशे रुपये मिळवणाऱ्या नवऱ्याबरोबर. पण थाट पाहिलास ना! वनिता विकास मंडळानं फॅन्सी ड्रेस परेड भरवली, त्यांत पहिला नंबर पटकावला या नीलांबरीनं. मराठी असून पंजाबी पोषाख कसा छान दिसतोय नाहीं हिला? खोटं नाहीं सांगत वल्ली, तूं सुद्धां सुरेखच दिसशील या पोषाखांत.

वल्लरीः–तें खरं हो, पण या बिन मॅट्रिक नि शंभर रुपड्या मिळणाराच्या बायकोची मी नक्कल केली तर साऱ्या बायका हंसतील मला. हें राहूं दे आतां वीराताई. तुमच्या त्या वेलादेवी नि वैजयन्तीराजे अजून कशा नाहीं आल्या? साडे श्री व्हायला आले!

वीराः–मीच जाऊन बघून येतें आतां. अग, त्या काय बड्या मुली. बसल्या असतील पत्र लिहीत. त्यांच्या पत्रव्यवहाराची कल्पना नाहीं तुला वल्ली. रोजचं पांच पांच रुपये पोस्टेज होतं एकेकीचं. जाऊन येतें हं. (जाते.)

वल्लरीः–पांच पांच रुपयांचीं पत्रें लिहितात या! विठे, ए विठे! ही दहा रुपयांची नोट बहिरूकडं दे आणि त्याला म्हणावं तिकिटं घेऊन ये. पोस्टाचीं बरं का. नाहीं तर स्टेशनवर जाऊन गाडीची येईल घेऊन. तुम्हा गडीमाणसांचा कांहीं नेम नाहीं. परवां विजयाबाईंच्या साहेबांना आगपेटी हवी होती सिगार स्मोक करायला. त्यांनीं शिपायाला सांगितलं खाली जाऊन पेटी घेऊन ये म्हणून. तर त्या आचरटानं एक पेटाराच नेऊन ठेवला त्यांच्यापुढं. म्हणून बहिरूला नीट सांग.

विठीः–बराय (जातां जातां) बाईसाब, विजयाबाईसाहेबांचा निरोप हाय आपल्याला. पल्याडल्या पाठकरांच्या घरीं गेल्यात त्या. तिथनं दोन मिनिटांत येतें असं सांगितलंय त्यांनीं—

वल्लरीः–(नापसंतीनें) कशाला येताहेत त्या बयाबाई या वेळीं! त्या राजकन्यांच्या पुढें मिरवून आपल्या बी. ए. चा दिमाख दाखवत राहील. या वेळीं नाहीं तिला इथं येऊं देतां उपयोगीं. (प्रकट) विठे, तूं घरांतच बैस आणि विजयाबाई आल्या तर त्यांना म्हणावं "बाईसाहेब घरीं नाहींत म्हणून." जा लौकर.

विठीः—(होकारदर्शक मान हालवून व आज हें नवल काय झालं या आनंदानं हंसत जाते व दुसरीकडून वल्लरीही जाते.)

वारणाः—(प्रवेशून) गेल्या तरी कुठं बाईसाहेब? आणि ही जगदंबाहि नाहीं दिसत कुठं. वेळेला उपयोगी पडली आहे असं व्हायचं नाहीं कधीं. विठे, ए विठे!

विठीः—(हंसत प्रवेश करते) कां हाळ्या मारतां वारणाबाई?

वारणाः—मंडईत जा आणि पांच शेर बटाटे, लिंबू, कोथिंबिर, तिनचार नारळ, अडिसरीभर पोहे, अडिसरीभर साखऱ्या, हिरवा लिपटनचा डबा, दोन शेर रवा हें सामायन घेऊन ये झटपट.

विठीः—लेकीचं लगीन काढलायसां का कायतरी इतकं सामान आणायला!

वारणाः—माझ्या लेकीचं लगीन निघालं तर माझं मी घेईन बघून. आज कुणी बड्या पाव्हण्या यायच्या आहेत ना आतां? त्या आल्यावर मग निघेल चहाचं नि फराळाचं. या अलीकडच्या फॅशनेबल बायकांचा कांहीं नेम नसतो विठे. मागें मी त्या वेल्हाळ वकिलाकडं कामाला होतें. त्याच्या बायकोनं आइस्क्रीम पार्टीचं वर्णन एका गोष्टींत वाचलन्. आणि आपण आपल्या पाहुण्यांना कधीं तशी पार्टी देऊं असं झालं तिला. आणि बरं का विठे, पुसाच्या महिन्यांत सकाळच्या भर थंडींत आइस्क्रीमची हौस फेडून घेतली तिनं! इथंहि तीच तऱ्हा आहे. मागून गडबड उडायला नको म्हणून अगोदरपासून तयारी ठेवतेंय मी ही.

विठीः—पर वारणाबाई पाव्हण्या आल्या तरी दोघीजणीच येणार आहेत. तेम्नी कशाला हो पांच शेर बटाटे नि अडिसरीभर साखऱ्या!

आणि व्हय हो, वारणाबाई दोन बाया आल्या तर फराळाचं सामान आणायला बाजारांत कशाला पळायला हवं? एवढीही तयारी असूं नये तुमची?

वारणाः—तुला करायच्या आहेत काय या उठाठेवी? कर म्हटलं तें करावं. असं कांहीं निमित्त असलं म्हणजेच जिन्नसपान्नस घरीं येतो.

बिठीः—आणि बाहेरबी जातो सांच्यापारीं.

वारणाः—बिठे, परवापासून बघतें आहे मी. मला तूं टोचून बोलायला लागली आहेस. माझी नालस्ती करून आपला सोवळेपणा बाईसाहेबांपुढं दाखवायचा तुझा बेत असेल तर तो मी साधूं द्यायची नाहीं बरं का. तुझ्या चोऱ्या चव्हाट्यावर मांडायला यायच्या नाहींत मला असं समजूं नको तूं. पण मी म्हणतें आपण एका जातीचीं माणसं. आपले तट पाडण्यापेक्षां आपण एक जुटीनं राहीलों, तर दोघींचा फायदा आहे त्यांत. बिठे, आपल्या जन्माची अशी वाताहत केलीत देवानं म्हणून तर थोरामोठ्यांच्या घरचे राडे उपसायचं नशिबीं आलंय आपल्या. पण हे कष्ट काढतांना होईल तितका फायदा करून नको का घ्यायला? आंधळ्या—मालकिणी—हो आंधळ्याच नाहींतर काय? घराबाहेर त्यांची नजर अगदी सुरेख असते. झकपक असेल तें चटकन दिततं यांना. पर घरांतलं कांहीं दिसत नाहीं, आणि पहायची तसदीहि घेत नाहींत या. यांच्या या ढिलेपणाचा फायदा आम्ही चाकर माणसांनी घेतलाच पाहिजे. आणि हें बघ, आपण अगदी खरेपणानें वागलों तरी दुसरी माणसं लुबाडणारच की यांना. मग आपण तरी कां सोडा? त्या मुनसफीण बाईच्या इथली गंगाबाई बघ. नातवाच्या कंबरेंत सोन्याचा करदोटा घातलान करून दसऱ्याला. आठ रुपड्या पगारांत सोन्याचे करदोटे होतात होय? मालकीण खाशी चांगली बी. ए. आहे. आणि उदार म्हणशील तर नखांतली माती नाही द्यायची आपल्या हातानं. पण चाकर माणसांनीं केलेली लूट कुठं दिसतेय अजागळाला?

विठीः–खरं म्हणतांयसां तुम्ही वारणाबाई. त्या टोपकर डागदाराची बाईबी तसलीच हाय बगा. ती बी लई शिकल्याली हाय म्हनं पण पावलीची भाजी म्हणून सांगून योक दुदगा भोपळा अन् पेंडीभर तांबडा पाला नेऊन देती आमची पुतळी. तीच हाय ना तिथं कामाला.

वारणाः–मग ! तूं शीक कीं कांहींतरी अक्कल. जा आतां सांगितलेले जिन्नस घेऊन ये लवकर.

विठीः–पर वारणाबाई, या वक्ताला भाजीची मंडई कशी सुरू असणार ! अन् बटाटे कोतमीर कशी मिळणार ?

वारणाः–अगदीं दगड आहेस तूं विठे. वाण्याचं दुकान तरी आहे ना उघडं ! तिथलं सामान घे वहीवर मांडून. आणि भलं मोठं गाठोळं करून ये घरांत. बटाट्याचे आणि भाजीचे नुसते पैसे मागून घे म्हणजे झालं. अर्धे तुला, अर्धे मला. मी सांगीन मग सगळे जिन्नस बरोबर आहेत असं.

विठीः–तुमा बामणांचं डोक्स म्हणत्यात त्यें हेंं वारणाबाई ! माझ्या टक्कुरीमंदी कांहीं आली नाहीं बघां ही युगत. आलोंच बघा आतां बाजार करून. (जाते)

वारणाः–आलं म्हणायचं भूत ताळयावर. मला गंगाबाईसारखा नातू नसला तरी चिंगीसारखी लेक तरी आहे. तिला करदोटा नाहीं घातला तरी गळयांत चेन तरी घालीनच येत्या संक्रांतीला. (वल्लरी येते)

वल्लरीः–कोण तें ! वारणाबाई ! काय हो करतांय इथं ?

वारणाः–आपलीच तयारी बाईसाहेब. आपल्या कुणी बड्या मैत्रिणी येणार आहेत बसायला असं विठी म्हणत होती. त्या आल्यावर चहा फराळ निघणारच. हें ओळखून तिला जिनसांची यादी देऊन मंडईत पाठविली आहे मीं. ऐन वेळीं गडबड होऊन बाईसाहेबांचा कमीपणा दिसं नये म्हणन—

वल्लरी:–छान छान केलंत हं वारणाबाई. त्या कांहीं खाणारपिणार नाहीं असं म्हणतील, पण समजा होय म्हणाल्या, तर त्या मिनीटाला आपली तयारी आहे असं दाखवून चकित करतां येईल त्यांना. वारणाबाई, जिन्नस मात्र सुरेख होऊं देत हं. शिरा, फोडणीचे पोहे, चहा तर आहेच मेला. आणि हें बघा शिऱ्यांत केशर घाला.

वारणा:–तोळाभर केशर आणवतें मग?

वल्लरी:–चांगलं चार तोळे आणवा. तोळाभर म्हणजे ( चिमूट दाखवून ) एवढंसं तर येईल. कुंजुषपणा नाहीं हो दिसतो कामां. अगदीं पिवळा जर्द होऊं दे शिरा.

वारणा:–आणि केळीं मुसंबींही आणवितें थोडीं!

वल्लरी:–आणि चिक्कु सफरचंदही आणवा.

वारणा:–बाईसाहेब, मागं मी आबासाहेब रत्नपारख्यांच्याकडं कामाला होतें. तिजोरीभर नोटा आहेत त्यांच्या इथं, आणि बायकोच्या अंगावर मणभर तरी सोनं असेल. पण कधीं जेवणखाण्याचा बेत केला तर हिंग जिरंसुद्धां जोकून देतील आणि तोलून घेतील. तुमचा दिलदारपणा दुसरीकडं बघितला नाहीं बाईसाहेब.

वल्लरी–अहो मणभर नाहीं खंडीभर सोनं अंगावर रचलं तरी आडाणीपणा का कमी होणार त्या बायकांचा! आम्हां शिकल्या सुधारलेल्या स्त्रियांची कशी होणार बरोबरी!

वारणा:–तुम्ही म्हणतां तें खरंच आहे बाईसाहेब. मग लागतेंच मी तयारीला. ( जाऊं लागते. )

वल्लरी:–अहो वारणाबाई! दिसलं नाहीं का तुम्हाला.

वारणा:–काय दिसायचं!

वल्लरी:–माझ्यांत नवीन कांहींच दिसत नाहीं तुम्हाला!

वारणाः—( निरखून पाहून ) दंडावर घड्याळ तर रोजचंच दिसतंय. झंपरला अडकवलेलं पेनही नेहमीचंच आहे. बिलवर, अंगठी—मला नाहीं बाई ओळखत काय नवीन आहे तें ?

वल्लरीः—परवा इथं सेवासमीतीची तारा ताडपत्रीकर पाहिली होतीत ना तुम्ही ?

वारणाः—म्हणजे ती गुलाबी नखांची ? हं हं ! आपणहि रंगविलेलीं दिसताहेत नखं ! छानच दिसताहेत हं पण ! त्या ताराबाईला कांहीं इतकीं शोभत नव्हतीं.

वल्लरीः—पण मला शोभताहेत ना ? तुम्ही दिसायला साध्या भोळ्या दिसतां वारणाबाई, पण चांगलं वाईट ओळखण्यांत पटाईत आहांत तुम्ही !

वारणाः—विद्वान मालकिणीकडं चाकरी करून दुसरं काय शिकायचं असतं आम्ही ? माझ्या अंगी जर थोडाफार शहाणपणा आलेला असला तर त्याचं स्रेय तुम्हांलाच आहे बाईसाहेब ( जातां जातां स्वगत ) हिला हरभऱ्याच्या झाडावर चढवल्याशिवाय माझं बस्तान काय बसणार नीट ! ( जाते. )

वल्लरीः—सगळा थाट झालाच म्हणायचा. हें नवं पातळ आणलंच शेवटीं. हे दुकानदार तर आताशा असे मस्तवाल झालेत कीं माणसाची पर्वा राहिली नाहीं मेल्यांना. एवढी मी स्वत: गेलें तर रोख पैसे मागायला लागला. आणि कारण काय, तर पहिली बाकी फार राहिलीय म्हणे. फार फार म्हणजे अडीचशेच ना ? 'हे गावासनं आल्याबरोबर सगळे पैसे देऊन टाकतें' असं खडसावल्यावर बसला गप्प. आणि दिलन् पातळ बांधून मुकाट्यानं. विजयाबाई म्हणाल्या पंचवीस रुपये किंमत फार झाली. अठरा नाहींतर वीस रुपये किंमत आहे या पातळाची. मीं म्हटलं असे ना ! वेळेला जिन्नस मिळाला आणि मी भारी किंमतीचे कपडे वापरतें असं सांगायला मिळालं पाहुण्यांना. मीसुद्धां त्यांच्या तोलाची विदुषी आहे असं इंप्रेशन झालं पाहिजे त्यांच्यावर.

(पडद्यांत—वल्ली! ए वल्ली ऽ य! अशी वीराची हांक) आल्या वाटतं त्या! (आपला थाट बरोबर आहे कीं नाहीं याची आरशांत पाहून खात्री करून घेते.) या या वेलादेवी, यावं वैजयंतीराजे! (स्वागताला जाते)

वीराः—(प्रवेश करून) ए वल्ली! आणखी दहा बारा मिनिटं वाट पाहिली पाहिजे तुला. वेलादेवी आणि वैजयंती राजे माझ्या बरोबर इकडं यायला निघाल्या होत्यासुद्धां. पण इतक्यांत इथल्या अप्सरा गायन क्लासच्या त्या उर्वशीबाई आल्या त्यांना बोलवायला. गाणं वाजवणं म्हटलं कीं दोघीही वेड्या होतात जशा कांहीं. पदवीवाल्या बाईपेक्षां संगीतप्रेमी स्त्रीला अधिक मान आहे, असं वाटतं त्यांना.

वल्लरीः—खरं खरं, अगदीं खरं आहे त्यांचं म्हणणं वीराताई. अगदीं त्यांच्यासारखंच मत आहे माझं. म्हणूनतर इंग्रजी शिकण्याच्या यांच्या आग्रहाकडं दुर्लक्ष करून मीं पेटी दिलरुबा घेतलाय.

वीराः—आहेच माझी वल्ली तशी! तूं या दोघी बहिणींच्या पसंतीला अगदीं पुरेपूर उतरणार बघ. बरं पण वैनी— नव्हे वल्ली, मी आणखी जराशी बाहेर जाऊन येतें हं. बाजारांत काम आहे थोडंसं.

वल्लरीः—पण आत्ताच काय नडलंय बाजाराचं? वेलादेवी नि वैजयंती राजे येथून गेल्यावर मग जा म्हणे.

वीराः—अग पण मलाहि जायचंय त्यांच्या बरोबरच. गदूळगांवाला अशोककालिन शिलालेख सांपडलेत म्हणे, ते पाहून यायचं ठरलंय त्यांचं. गदूळगांवचा रस्ता खराब आहे, आणि तिकडं मोटारी बिटारी कांहीं जात नाहींत. पण नवं कांहीं बघायचं म्हटलं कीं त्या खर्चाकडं बघायच्या नाहींत कीं दगदगीला डरायच्या नाहींत. खर्चाची पर्वा कशाला करतील म्हणा त्या? बोलून चालून राजकन्या. पण दगदग थोडी का होणार या सफरींत? पण त्यांचं म्हणणं ज्ञान फुकटावारी मिळत नसतं. त्याला कांहीं ना कांहीं किंमत द्यावीच लागते.

वल्लरी:–माझीं नी त्यांची मतं काय पण जुळतात! वीराताई, मी सुद्धा नव कांहीं पहायचं झालं तर मागं पुढं पहात नाहीं कधी. मीहि येतें मग शिळालेख बघायला.

वीरा:–तुला विचारणारच होत्या त्या वल्ली. पण तुझ्या आधी विजयाबाईनी लावली आपली वर्णी. बारा रुपये सीट प्रमाणं एक पांच सीटची टूरींग ठरवलीय त्यांनीं. त्यांत ड्रायव्हरची एक सीट जाऊन राहिल्या चार सीटस्. आम्ही तिघी आणि चौथ्या विजयाबाई. त्या आल्या नसत्या तर वेलादेवी तुलाच विचारणार होत्या.

वल्लरी:–विजयाबाई पोंचल्या का येवढ्यांत त्यांच्यापर्यंत! बोलल्या सुद्धां नाहींत मला.

वीरा:–जग तुझ्यासारखं भोळं नाहीं आहे वल्ली. तूं एकदा एकाद्यावर भाळलीस म्हणजे त्याच्यासाठीं काय हव्वं तें करशील. विजयाबाईशीं तुझी गट्टी जमल्यापासून सावलीसारखी तूं त्यांच्या मागून फिरलीस. नवऱ्याची नी मुलीची फिकीर न करतां त्या जातील तिथं गेलीस. त्यांचं कपाळ जरा दुखलं तर तासतासभर बाम चोळीत बसलीस–पण विजयाबाईना त्याची किंमत तितकीच. बरं जाऊन येतें हं मी वल्ली. त्यांना जर का औषध आणून दिलं नाहीं मीं, तर अर्धमेली करतील मला.

वल्लरी:–पण औषध हवंय तरी कसलं त्यांना?

वीरा:–अग धुमशान. हें एक नवीन जपानी औषध आहे. आवाज साफ होण्यासाठीं उपयोगी आहे तें.

वल्लरी:–(घोकते) हां हां तें होय! आहे मला माहीत. माझासुद्धां आवाज परवापासून ठीक नाहीं वीराताई. मला देखील द्या तें आणून.

वीरा:–आणतें हं (हंसत जाते.)

वल्लरी:–काय म्हणाली वीराताई त्या औषधाचं नांव? धुमशान नाहीं का? जपानी आहे तें. जपानी धुमशान! (चार पांच वेळां घोकते) विसरायला नको आणीक. बरं, आतां पेटी नी दिलरुबा ठेवला पाहिजे

काढून दिसायजोगा. विठे, ए विठे, वारणाबाई, (वारणाबाईच्या तोंडांत कसला तरी बकणा भरला आहे अशा स्थितींत प्रवेश करते) हें बघा वारणाबाई, विठी नाहीं आहे वाटतं घरांत! हो मंडईत धाडली आहेत नाहीं का तिला? मग आतां एक काम करा माझं. माडीवर बाजाची पेटी नि दिलरुबा आहे तेवढा आणून ठेवा इथं.

वारणा:–(तोंडांतील बकण्यामुळें चोंदलेल्या आवाजानें, तोंड बाजूस वळवून) बरं आहे.

वल्लरी:–तुमचाहि आवाज बिघडला वाटतं एकाएकीं! तुम्हांलाहि जपानी धुमशान दिलं पाहिजे. पण हे विदुषींचे उपचार तुम्हाला कुठले मानवयाला?

वारणा:–(आतां तोंड मोकळें झाल्यानें नेहमींच्या आवाजांत) मला कशाला हवेत उपाय आणि उपचार? आणि घटकेला होणाऱ्या दुखण्याला इलाज करायचे तरी कसले? असं मला कां होतं हें मला ठाऊक आहे आणि त्याच्यावरले इलाजहि ठाऊक आहेत. औषधांनीं मारण्यापेक्षा दुखणीं गिळून पचवून टाकण्याचाच आम्ही सराव केलाय बाईसाहेब.

वल्लरी:–तुमचं एकेक विलक्षणच असतं वारणाबाई. मग आणतां ना पेटी नि दिलरुबा? पाहुण्या यायच्या आंत आणलं पाहिजे.

वारणा:–आणतें कीं, त्याला कशाला हवाय वेळ? (जाते)

वल्लरी:–आतां गढूळगांवच्या ट्रिपचं बघितलं पाहिजे अगोदर. यांच्या गाडींत जागा नसली तर पेशल गाडी काढून जाईन मी. बहिरू जाऊन ठरविल गाडी. पाठवतेंच आतां त्याला. (जाऊं लागते तों वत्सलाबाई येते)

वत्सला:–(तिथला थाटमाट पाहून) आज कुणी यायचंय वाटतं! (या जुन्या बाईशीं बोलणें हें आपल्या विद्वत्तेला व आधुनिकपणाला कमीपणाचें आहे अशा तुसडेपणानें वल्लरी नुसत्या मानेनेंच होकार देते.) बापूकडून कांहीं पत्रबित्र? परत कधीं येणार कांहीं कळलं का?

वल्लरी:–अदर मंथमधें (other month) येतील.

**वत्सला**:—वंशी शाळेतून नाहीं आली अजून?

**वल्लरी**:—फाइव्हला शाळा सुटायची तर आतां कशी येईल ती? (आंत निघून जाते व वडील जावेबरोबर फारसें बोलायची इच्छा नाहीं असें दर्शविते)

**वत्सला**:—(स्वगत) नवा नाहीं कांहीं हा प्रकार. वेडी मुलगी आहे झालं! ही असं झाडून टाकते म्हणून फिरकूं नये असं वाटतं कधींकधीं. पण बापूंच्यासाठीं आणि या छोट्या वंशीसाठीं जीव ओढ घेतो. आणि एकाला वेड लागलं म्हणून दुसऱ्यानं कशाला वेडं व्हायचं?

(विठी बाजारचें गाठोळें घेऊन येते)

**विठी**:—कोण काकूबाई, एकल्याच काय करतांय इथं?

**वत्सला**:—आत्ताच येतेंय मी. (ओच्यांतून एक पुडी काढून) हें बघ विठे वंशीताई शाळेतून आली कीं नाहीं म्हणजे हें दे तिला.

**विठी**:—काय आहे तें काकूबाई?

**वत्सला**:—अग हे गेले होते नरसोबाच्या वाडीला. तिथला प्रसाद आणलाय वंशीला. वीराताई आज दिसत नाहीं कुठं?

**विठी**:—त्यांच्या कुणी मैतरणी आल्यात नाहीं का, त्यांच्याकडं गेल्यात जणुं.

**वत्सला**:—ती आली कीं नाहीं म्हणजे तिलाहि सांग मी येऊन गेलें म्हणून. आणि म्हणावं संध्याकाळीं सवड झाली तर जा येऊन घटकाभर. (वल्लरी परत येते व वड्याचें तेल वांग्यावर काढायचें या न्यायानें विठीवर कावते.)

**वल्लरी**:—विठे, कांहीं मागची पुढची शुद्ध आहे का तुला? काय गप्पा छाटायला दुसरी जागा नाहींच कीं काय? त्या श्रीमंत आणि सुशिक्षित लेड्यांच्यासाठीं तयार करून ठेवलेल्या बैठकींत हें तुझं गबाळग्रंथी ध्यान पाहून काय वाटेल त्यांना? हो चालती पाहूं इथून?

**विठी**:—यांनीं हटिकलं म्हणून थांबलें खिनभर इथं. उगीच नगा बोलूं मला. (टेबलावर प्रसादाची पुडी आदळून) हा घ्या काकूबाईनीं दिलेला वाडीच्या दत्ताचा परसाद. वंशीताईसनि मुद्दाम आणलाय त्यांनीं.

वल्लरीः–अहाहा रे वेडपट! अगदीं वेंधळी आहेस तूं! या स्वच्छ टेबलावर ही घाण टाकलीस! अगदींच कशी अक्कल नाहीं तुला? (हातानें झाडून पुडी खालीं ढकलते.)

वत्सलाः–(पुडी उचलून) हें काय वल्लरीबाई? देवाचा प्रसाद असा जमनीवर का लवंडायचा? उचलून घ्यायला सांगितलं असतंत तर मीं सुद्धां उचलून ठेवलं असतं.

वल्लरीः–इतका मोलाचा वाटत होता तर आणलांतच कशाला?

वत्सलाः–(उदासीनपणें) चुकलं बरं माझं. आम्ही जुन्या बायका खुळ्या. आम्हांला कुठलं असणार इतकं शहाणपण? अनुभवानं कळा-यच्या एकेक गोष्टी. (कुंकु लावून घेऊन जाते.)

वल्लरीः–गेली पिडा एकदाची; पण आमच्या गेस्टीणबाई कशा नाहीं आल्या अजून?

विजयाः–(प्रवेश करून) तुम्ही बोलावलं नाहींत तरी आलें मी वल्लरीबाई.

वल्लरीः–मग मी धाडणारच होतें आतां चिठीला तुमच्याकडं. ती मंडईत गेली होती म्हणून थांबलें होतें. आणि विजयाबाई तुम्हांला बोला-वल्यावांचून माझं चालेल तरी कसं? तुम्हासारख्या विदुषींचं कांहीं नडा-यचं नाहीं आमच्यासारख्यावांचून. गढूळगांवची ट्रिप ठरवलीत तेव्हां कांहीं झाली नाहीं तुम्हांला या मेल्या वल्लरीची आठवण!

विजयाः–असं! हा राग आहे होय? पण तुम्हीच सांगा वल्लरीबाई, राजकन्यांच्या सफरींत मीच जिथं पाहुणी, तिथं तुमची अगांतुकी करूं तरी कशी मी?

वल्लरीः–पण मला मागं ठेवून जाण्यापेक्षां आपणच येत नाहीं म्हणणं हें तरी होतं ना तुमच्या हातचं?

विजयाः–मग तसं मीं म्हटलं नाहीं असं का वाटतं तुम्हांला? पण माझं ऐकताहेत म्हणतां कीं काय त्या? वेळादेवी म्हणाल्या तुम्ही मागं पाय

घेतला तर दुसरी कुणी अशिक्षित बाई घुसेल आपल्या गाडींत आणि वैजयंतीदेवींचं म्हणणं येत्या ऑल इंडिया वुइमेन्स फेडरेशनमध्ये त्यांना डायव्होर्स बिलाचा ठराव मांडायचा आहे त्यावर डिस्कशन करायला मीच पाहिजे म्हणून. माझा निरुपाय झाला नि ' होय ' म्हणावंच लागलं मला.

**वल्लरी:**—लागलं असेल हो. पण माझाहि टरला बेत गढूळगांवाला जायचा. तुमच्या गाडींत जागा नाहीं, तर माझी स्पेशल गाडी काढणार मी. अगदीं तुमच्या पाठोपाट.

**विजया:**—मग काय मज्जाच झाली. बरं वल्लरीबाई हें बघा बरं ! तुमच्या चॉईसवर खरेदी करायचं ठरवलं आहे मी. (एका पेपरबॉक्समधून निरनिराळ्या प्रकारचे चष्मे काढून दाखविते.) यांतली कोणती फ्रेम पसंत करतां तुम्ही ?

**वल्लरी:**—पण तुमचं हें चष्म्याचं मधेंच काय निघालं? एकाएकी डोळे कसे बिघडले ?

**विजया:**— डोळे नाहीं म्हणा बिघडले. पण परवां थिऑसॉफिकल कन्व्हेन्शनमध्यें बघितलं नाहींत का तुम्ही, बहुतेक लेडी डेलिगेट्स ग्लासेस वापरणाऱ्या होत्या. आणि ग्लासेस वापरणाऱ्या विदुषींचंच ऑडिअन्सवर इम्प्रेशन पडत होतं असं दिसून आलं मला. आज यायच्या राजकन्यासुद्धां स्पेक्सवाल्याच आहेत. म्हणून आपलं वाटलं घेऊन टेवावा. जिथं जसा समाज असेल तिथं त्याप्रमाणं त्याचा उपयोग येईल करायला.

**वल्लरी:**—मग मीही घेतें बाई एक. वेलादेवी, वैजयन्तीराजे यांची फ्रेम कसली आहे ?

**विजया:**—ही असली गोल्डन फ्रेम आहे दोघींचीही. पण याची किंमत टाऊक आहे का तुम्हाला ? पंचवीस ! प्लस ग्लासेसचे पंधरा !

**वल्लरी:**—मला नाहीं बाई आवडली ही सोनेरी फ्रेम. त्यापेक्षां ही शिंगटाची ब्राऊन रंगाचीच ठसठशीत दिसतेय. तुमच्या गोऱ्यापान कलरला ती उठून दिसेल अगदीं.

विजयाः—बरं तर तीच घेतें मी. तुम्ही कोणची घेतां मग?

वल्लरीः—आधीं ग्लासेस जमले पाहिजेत ना डोळयाला? चला आंत कोणते लागताहेत ते बघून मग ठरवितें. इथं एकदम त्या आल्या, तर आमचं हें गुपित लक्षांत यायचं त्यांच्या. (दोघी चष्मे घेऊन आंत जातात. वीराताई वत्सलाबाईस हाताला धरून प्रवेश करते.)

वीराः—वैनी, शप्पत आहे तुला माझ्या गळयाची. खरं सांग.बघूं काय झालं तें? वल्लरीवैनीनं तुझं मन दुखवलेलं दिसतंय. होय ना?

वत्सलाः—तिच्याकडं काय दोष आहे वीराताई? माझीच चूक झाली. थोरमोठ्या विदुषींची बैठक भरायची तिथं यावंच का मुळीं माझ्यासारख्या अडाणी बाईनं? आणि ज्यांच्या घरीं गडगंच आहे त्यांच्या घरीं बर्फीचे दोन तुकडे देण्याचा लुब्रेपणा कशाला हवा होता मी करायला? जातें मी वीराताई, नाहींतर तुझी वैनी आणखी कांहींतरी—

वीराः—बघायचंच आहे मला ती काय करती आहे तें. या थिल्लर भवानीनं तुझ्यासारख्या देवतेचा अपमान करावा——

वत्सलाः—हें काय तुझं वीराताई! किती झालं तरी वडील आहे ती तुझ्यापरीस. तिला पाहिजे तसं बोलणं——

वीराः—आणि तूं नाहींस वाटतं तिच्याहून वडील? तुझा अपमान करतांना तिला नाहीं शरम वाटली ती?

वत्सलाः—जाऊं दे कीं तें वीराताई! किती झाली तरी ती आपली आहे. ती चुकली—आणि तरुणपणीं व्हयचीच चूक थोडीशी—तरी आपण समजूतदार माणसांनीं दुर्लक्ष केलं पाहिजे तिकडं. एकानं गाय मारली म्हणून दुसऱ्यानं वासरुं मारायचं म्हटलं तर थांबायचा कधीं हा क्रम? त्यापेक्षां आपणच गप्प बसावं हें बरं नाहीं का? बरं हें घे वीराताई. वंशीला दे हं

ही बर्फी. तिला भारी आवडते म्हणून मुद्दाम आलें घेऊन. आणि यांनींही लावली घाई—अगोदर पोचवून ये म्हणून.

वीरा:—(पुडा उघडून एक तुकडा तोंडांत टाकून) वैनी, वंशी तेवढी तुझी नि भाऊंची. आणि मी कुणी नव्हे तुमची असंच ना? माझी नाहीं आठवण झाली तुम्हांला? बरं असूं दे हं. आतां आलें म्हणजे भाऊंच्या बरोबर अश्शी भांडतें—नाहीं तर येतच नाहीं जा आतां घरीं. वंशीला तेवढा खाऊ आणून देतेस आठवणीनं, आणि आम्हाला तेवढा—

वत्सला:—येवढ्या तेवढ्यासाठीं रुसायची तुझी सवय अजून गेली नाहीं वीराताई! या तुझ्या सवयीसाठींच बरं कां मीं तुला बर्फी आणली नाहीं. किंवा यांनीं मला आणूं दिली नाहीं. एकट्या वंशीला खाऊ आणून दिला म्हणजे तूं रुसशील हा यांचा अजमास अगदीं खरा ठरला. तुला आधीं रुसवायचं आणि तूं अगदीं रडकुंडीला आलीस म्हणजे मग ती मौज पाहून सर्वांनीं एकदम तोंडं गोड करायचीं असं ठरवूनच ठेवलंय यांनीं. वीराताईचा रुसवा बघितला कीं पोट भरून येतं असं नेहमी म्हणतात हे. तुला संध्याकाळीं पाठवून दे असा निरोप मी विठीजवळ सांगितला आहे कीं नाहीं विचार तिलाच. तुझी आठवण झाल्याशिवाय का हा निरोप सांगितला असेल? यांनीं नि मीच काय, पण माधव मुरलीनं सुद्धां तुकडा उष्टावला नाहीं अजून. सर्वांचं म्हणणं वीराताई येऊं दे.

वीरा:—(गहिंवरून) वैनी, किती प्रेमळ मन ग तुम्हां सर्व माणसांचं! मी तुला अगदी खरं खरं सांगतें वैनी— आईबापांच्या मायेला मुकलेल्या मुलांबद्दल लोक हळहळायला लागले म्हणजे मला हंसायला येतं. माझ्यापुरतं मला असं वाटतं, आमचे आई नी बाबा लवकर वारले हें बरंच झालं. त्यामुळें भाऊ वैनींची ममता मला नी बापूला मिळाली. या तुमच्या ममतेची फेड आमच्या हातून कधीं होईल का वैनी? तुमच्या ममतेचं उतराई व्हायचं दूरच राहिलं, अपमान करून घ्यायचे प्रसंग

मात्र ओढवतात तुमच्यावर! पण वैनी, हा मूर्खपणा झाडून टाकण्या-साठीच खटपट चालली आहे माझी. अशी अद्दल घडवतें कीं बघत रहावं.

वत्सलाः–कांहीं भलतं सलतं करूं नकोस हं! आपल्या माणसाची फजीती ती आपलीच फजीति नाहीं का?

वीराः–कळतंय मला तें. ये आतां तू वैनी. (वत्सलाबाई जाते. वल्लरी व विजया चाळशा लावून येतात. वल्लरीची सोनेरी फ्रेम.)

वल्लरीः–आणलंत का तुमचं औषध— धुमशान जपानी?

वीराः–हो आणलं. काय तरी ग वल्ली हें तुमचं गांव! धड खेडं ना शहर! पॅकबंद कुपी कांहीं मिळाली नाहीं. मग दोन सुट्या कुप्या करून आणाव्या लागल्या मला. (कुप्या काढून) एक त्यांना आणि दुसरी तुला.

वल्लरीः–काय का होईना, पण औषध मिळालं हें काय थोडं झालं? या मेल्या खोकल्यानं आवाजाचं खोबरं व्हायला लागलं होतं.

विजयाः–आवाजावरलं का औषध आहे हें! मग मलाहि पाहिजे आहे बाई. उद्यां कन्याशाळेंत भाषण आहे, त्या वेळीं आवाज साफ पाहिजे. अलीकडं काय होतं बघा वीराताई, पंधरावीस मिनिटं सारखं बोललं, तरी आवाज लागतो पिंजायला. आणि मग भाषण घ्यावं लागतं गुंडाळून. बरं भाषणच करूं नये म्हटलं तर चालतंय कुठं? या असल्या गावांत सुशिक्षित माणसांचा असतो अभाव. बायकांत तर विचारूंच नका. मग आमच्यासारखी एखादी विदुषी सापडली कीं तिला राबवून घ्यावयाची साऱ्यांची धडपड. ग्रामोद्धार संघाची सभा झाली चला विजयाबाई अध्यक्ष व्हायला, शिशुसप्ताह सुरू झाला द्या विजयाबाई व्याख्यान, कन्याशाळेचं सम्मेलन आलं करा विजयाबाई भाषण, असं चालतं सारखं.

वीरा:–भारीच त्रास आहे म्हणायचा! बाकी हा त्रास तुम्हांला दुसऱ्या एका प्रकारें उपकारकच होत असेल. तुम्ही सरावानं आता उत्तम वक्त्या झाल्या असाल?

विजया:–(लटक्या विनयानं) तसंच कांहीं नाहीं, बोलतें झालं कशीतरी. वल्लरीबाई, आल्या वाटतं वेलादेवी!

वल्लरी:–यावं यावं वेलादेवी— यावं वैजयंतीराजे! (वेलादेवी व वैजयंतीराजे, वय वीराताई एवढें. पोषाख अगदीं नव्या चित्रपटांतील मीनाक्षी वनमालेसारखा. अतिरेकाचाच नव्हे तर हास्यास्पद होण्याइतका नखरेलपणा त्यांच्या पोषाखांत दिसावा. वेलादेवी एकदां डावीकडे व एकदां उजवीकडे मान कलती करून 'याक् याक् याक्' असें म्हणतांना जबडा विचकेल अशा थाटानें बोलते व वैजयंतीराजे तोंडाचा चंबू करून 'कुहू कुहू' सारख्या आवाजांत डोळे उडवीत बोलते.)

वेला:–आम्हाला यायला लेट झाला थोडा. म्यापी क्यरा वल्लरीबॅई.

वैजयंती:–तुमचि खूटी नै नं झाली? वल्ॅरिबै विजैबैना किती टैम झाली यूनं?

वल्लरी:–(त्यांच्या व आपल्या थाटांतील कमीजास्त पहात पहात व त्यांच्यापैकी कुणासारख्या धाटणीनें बोलावें या फिकीरींत असतांनाच वेलादेवीकडे तिच्यासारखी मान करून आणि वैजयंतीदेवीकडे तोंडाचा चंबू करून बोलते) लेट कांहीं नाहीं झाला फारसा आपल्याला. अन् विजयाबाई आतां ह्याच येताहेत.

वेला:–तूमची ही व्यीराताई आमची रिअल फ्रेंड आहे वल्लरीबॅई!

वैजयंती:–तिच्यामुळंच तुमची अॅक्वेंटन्स झाली.

वल्लरी:–मग वीराताईसारखीच मलाही आपली फ्रेंडीण समजा.

विजया:-( स्वगत ) पाजळलेन दिवे आपल्या इंग्रजीचे.

[ वेला व वैजयंती वीराकडे पाहून हंसतात. ]

वीरा:-आमच्या या वल्लीची आणि तुमची फ्रेंडशिप छान जुळेल हो वेलादेवी. तुम्हांला आवडतात त्याच गोष्टी हिला आवडतात आणि बरं का वैजयंतीराजे, आमच्या वल्लीचं कलाप्रेमही और आहे. She is realy a born artist.

वेला:-व्यल्ली ! A good name indeed ! यांचं नांवच क्यलापूर्ण आहे ! व्यल्ली, तुमी क्योनच्या क्यालेजाच्या स्टूडंट ?

वल्लरी:-मी प्रो. कात्रे यांच्या टेलरिंग कॉलेजांत नांव घातलं होतं.

वीरा:-आमच्या वल्लीचा अभ्यास प्रायव्हेटली झालेला आहे वेलादेवी. तिला डिग्री नसली तरी इंग्रजी उत्तम येतं. विजयाबाईसारख्या विदुषीच्या सहवासांत राहून आमच्या वल्लीनं वाङ्मयांत, सामाजिक कार्यांत झकास प्रगति केली आहे. आमच्या बापूचं– म्हणजे माझ्या ब्रदरचं नशीब म्हणून त्याला अशी बायको मिळाली आणि मला अशी नमुनेदार वैनी लाभली.

विजया:-माझ्या बरोबर नेहमी येतात वल्लरीबाई सभापरिषदांना.

वीरा:-या सार्वजनिक कार्यक्रमामुळें आमच्या वल्लीला तिळाची फुरसत नसते. आमच्या बापूचं हिच्यावर अतिशय प्रेम; हिच्या सहवासासाठीं तो अगदीं भुकेलेला असतो पण त्याला हिची गांठ म्हणजे कपिलाषष्ठीचा योग होतो. आमच्या वल्लीला वंशी झालीय एक. पण मुलीच्या प्रेमांत गुरफटून राहून सार्वजनिक कामांत कसली म्हटल्या कसली हयगय करीत नाहीं आमची वल्ली !

वल्लरी:-( वीराच्या बोलण्यांतील उपरोध लक्षांत येत नाहीं. ही आपली खरीच स्तुती आहे असें वाटून ) बापू आणि वंशी हीं काय घरचींच मेन् आहेत. त्यांचं काय होतंच आहे कसंतरी. घरीं चाकर माणसं असतात आणि तीं सर्व व्यवस्था करतात. प्रत्येकानं आपापलं काम काय

काय करायचं हें टीच ( Teach ) केलंय मीं सगळयांना. म्हणून मिळतो मला वेळ सभापरिषदांना जायला. या विजयाबाईना खरं म्हटलं तर हौस कमीच. घरच्या घरीं बायका जमवून व्याख्यानं मात्र छान झोडतात हो. पण मी टुमणं लावून बाहेर काढतें त्यांना. मीं खेचून नेलं म्हणून तर त्यांना इतक्या परिषदांच्या नि समित्यांच्या कार्यकारी मंडळावर जागा मिळाल्या आणि असा मान मिळूं लागलेला पाहिल्यापासून मात्र कुठं यायला नाहीं म्हणत नाहींत. सार्वजनिक वर्कमध्यें विजयाबाईना आज जो मान मिळत आहे तो त्यांना मी मिळवून दिलाय खरं म्हटलं तर. ( स्वगत ) मला ही नेते सभा परिषदांना म्हणून ऐट मारते. मग मी वरी गप्प बसेन? घे म्हणावं आतां.

**वेला:**—म्हणजे तुम्ही दोघी मैत्रिणी एकमेकींच्या सप्लीमेंट्स आहां तर! व्हेरी नाइस ( Very nice )! आम्ही दुसऱ्या ठिकाणीं पाहतों, एक मेकींना पुश ( Push ) देणाऱ्या मैत्रिणी कुठं दिसतच नायत. एक पुढं चालली कीं दुसरी तिला मागं खेचते!

**वैजयन्ती:**—विजैबैसखीं वर्कर समाजाला मिळवून दिल्याबद्दल अभिनंदन केलं पैजे वल्लरीबैचं.

**विजया:**—वल्लरीबाईच्या हौसेखातर मी सभा सम्मेलनाला जाऊं लागलें असलें तरी जबाबदारीचीं कामं माणसाच्या योग्यतेप्रमाणंच मिळणार कीं. वल्लरीबाईनीं परवा आपल्या बिठीलाही घेतली होती वूईमेन्स कौन्सिलच्या मीटिंगला गेल्या वेळीं. पण तिचं नांव कांहीं कुणी प्रपोज केलं नाहीं देश-मुख कमिशन पुढं साक्ष देण्यासाठीं. मला मात्र जावं लागणार आतां त्यासाठीं मुंबईला.

**वीरा:**—तुम्ही देशमुख कमिशनपुढं साक्षीला जाणार? विजयाबाई! माहीतच नव्हतं मला. वैजयन्तीराजे, बघा, इथं आल्याचा फायदा झाला कीं नाहीं तो! तुम्हाला साक्षीच्या कामांत एक Experienced बोडी-

दारीण मिळाली. करा त्यांच्याबरोबर डिसक्शन. प्रत्येक मुद्द्यावर एक धोरणाची साक्ष होऊं दे दोघींची.

वेला:–पॅण वैजायान्तीराज्यांना साक्षीला जायचं कशं जमनार? त्याच वेळीं त्यांचं ऑपरेशन ठरलंय्.

वल्लरी:–(स्वगत) छान झालं. मला धास्ती पडली साक्षीच्या निमित्तानं ही घोरपड या राजकन्येला चिकटतीय कीं काय! (प्रकट) ऑप्रेशन ठरलंय यांचं? तें कशासाठीं?

वैजयन्ती:–मला कस्संच होतं अताशा. त्यासाठीं दंडांतील एक नव्हं कापून घ्यायचा ॲडव्हाइस दिलाय स्पेशालिस्टानीं. आमच्या बहुतेक फ्रेंड्सनीं हें ऑपरेशन घेतलंय करून.

वल्लरी:–मलासुद्धां आताशा कसंसंच होतं. आणि दंडांतली शीरहि थरथरल्या सारखी वाटते.

वेला:–मॅग बरोब्बर. त्याच सिंप्टम्स् आहेत या. वल्लीबाई, ऑपरेश्यननं तुमची श्यारी तक्रार धूर होईल.

वल्लरी:–वीराताई, तुमच्याबरोबरच मुंबईला येतें मग.

वीरा:–खुश्शाल ये वै—नव्हे वल्ली. तिथं मी तुझा उत्तम शिरच्छेद करवतें.

वेला:–पण आपरेशननंतरचं पथ्यही संभाळलं पाह्यज्ये तुम्ही व्यल्लीबाई. हें ऑपरेश्यन झाल्यावर डान्सिंगचा व्यायाम नियमितपणें घ्यायला पाहिजे असं सांगितलंय डॉक्टरांनीं. त्यासाठीं तर वैजयन्तिराजांनीं डान्सिंग टीच्यर ठ्येवून प्रॅक्टीश चालवलं आहे आत्तांपासून.

वल्लरी:–मग तर जमतच झाली कीं! मला डान्सची भारी भारी आवड आहे. डान्स शिकायचं ठरवूनच ठेवलंय मीं नाहींतरी. अन् आपल्या देशी थयथयाटापेक्षां मला इंग्रजी नाचच भारी आवडतो बघा. परवां मी

एक इंग्रजी चित्रपट बघायला गेलें होतें. त्यांतल्या डान्सचं इतकं इतकं इंप्रेशन झालं माझ्या मनावर? घरीं येतांच खोलींत जाऊन नाचून बघितलं मी थोडं.

**विजया:**—पण तो दोघांचा नाच तुम्ही एकट्याच कशा नाचलां वल्लरीबाई! बापूराव तर इथं नाहींत.

**वीरा:**—पण खोलींत खांब असेलच कीं प्रॅक्टिसला. तेवढं पुरे.

**वैजयंती:**—What a funny girl you are Veera!

**वल्लरी:**—थट्टा करण्यांत कोणी हात धरणार नाहीं आमच्या वीराताईचा.

**वेला:**—व्यल्लीबाईंना म्युझियकचा शोक आशनारच. त्याच्या जोडीला डान्स आल्यावर त्यांचं लाइफ खरोखर कलरफुल होईल.

**वैजयन्ती:**—आमच्या प्रोफेसर इंगलेरडचं असं मत आहे कीं म्युझिक अन् डॅन्सनं स्त्रीच्या जीवनाला खरी पूर्णता येते. नृत्य गायन तिच्या ठिकाणीं स्वाभाविक असतं, त्याचा विकास मात्र केला पाहिजे. जिला पेटी नाहीं, जिनं दिलरुबा पाहिला नाहीं ती स्त्री कितीही शिकली तरी अडाणीच समजली पाहिजे.

**वल्लरी:**—ऐका विजयाबाई! दिलरुबा घ्या म्हणून कधिची पाठी लागलेंय् मी यांच्या.

**विजया:**—माझ्या धाकट्या बहिणीनं पेटी नेली आणि पुतणीनं दिलरुबा नेला. पेटी दिलरुबाच काय, पण व्हायोलिअन बुलबुलतरंगहि होता माझा. पण लहानमुलींच्या हौसेपुढं आपल्या आवडीनावडी दडपून ठेवाव्या लागतात आम्हां मोठ्या माणसांना. आतां फक्त ग्रामोफोनवर माझी संगीताची आवड तृप्त करून घेतें मी. मी कांहीं संगीतशत्रु नाहीं वीराताई.

**वीरा:**—पण कांहीं झालं तरी वल्लीसारखी जोरकस आवड नाहीं तुमची. आपलं प्रॅक्टिस सोडून ती आपलीं वाद्यं दुसऱ्याला द्यायचीच नाहीं कधीं.

वल्लरी:—एक दिवस प्रॅक्टिस नसलं कीं मला चैनच पडत नाहीं. आपलीं हत्यारं आपल्या अगदीं नजरेसमोर लागतात माझ्या.

वेला:—मग आम्हाला दंखवा ना कांहींतरी वाजवून.

वैजयन्ती:—It will be a great pleasure to us. Do play something Vallibai. वजवाच कईतरी.

विजया:—( वल्लरीच्या फजीतीची आयती आलेली संधी साधावी या हेतूनं ) विरस नका करूं वल्लरीबाई पाहुण्यांचा. हं आटपा आतां.

वल्लरी:—( बावरलेल्या चर्येनें ) अहो, माझं काय घेऊन बसलांत! कधीं नव्हे त्या वेलादेवी नि वैजयंतीराजे आलेल्या. त्यांचं टॉकिंग ( Talking ) ऐकण्याचं सोडून गाणं वाजवणं कसलं करतां? अन् करायचंच असलं तरी त्यांना आग्रह करा कीं. कांहीं नवं तरी ऐकायला मिळेल, माझं वाजवणं तुम्ही जन्मभर ऐकलं आहेत आणि तुमचं गाणं मी ऐकतें आहें—

वीरा:—म्हणजे! विजयाबाई गातात! मग तर तुमचा जोड कार्यक्रम झालाच पाहिजे अवश्य. विजयाबाई म्हणतील, वल्ली वांजवीत बसेल. आतां वेळ नका बाई लावूं.

विजया:—पण वल्लरीबाई काय म्हणाल्यांत तें ऐकलंत का? पाहुण्यांचं गायनवादन खरं महत्त्वाचं आहे, तें होऊं दे.

वैजयंती:—Let us make a compromise. अगोदर तुम्ही अन् मग आम्ही. ठरलं?

वेला:—या स्यूचनेला मॅझ्यं पूर्ण अनुमोदन आहे.

वीरा:—हं आटप आतां वल्ली.

वल्लरी:—उगीच नाहीं तो आग्रह कशाला करतेस ग वीराताई! अन् आतां वेळ तरी कुठं आहे? गद्धळगांवाला ना जायचं ठरलंय तुमचं?

वेला:–शांगायच्चं विशरलें तुला वीराताई. गद्धूळगांवचा बेत कॅन्शलड् (Cancelled). कारण मॅला एक्याएक्यी आठवण झाली आज १५ तारीख म्हणून. १५ तारीख म्हणजे मॅझ्या शँड बेरिअलचा दिवस (Sand burial) बॅर का वल्लीबाई. एका युराग्वेअन डॉक्टरणीनं हा उपाय काढलाय शोधून. एका मोठ्या पिपांत उभं रहायच्यं अन् त्यांत वाळू ओतून महिन्यांतून चार वेळ पुरुन घ्यायच्यं. या हीट आणि प्रेशर मुळं चेहरा टवटवीत होतो. आणि केसांना आपोआप कर्ल पडतात. आम्ही साऱ्या मैत्रिणींनां चालवला आहे हा प्रयोग. हा प्रयोग युरोप अमेरिकेंत तर फारच लोकप्रिय आणि उपयुक्त ठरलाय.

विजया:–मींही वाचलंय त्याबद्दल इंग्लीश मासिकांत. फोटोसुद्धा आले होते.

वैजयन्ती:–व्हिटा फ्लेक्स मॅगॅझिनमधि असेल फार करून.

विजया:–हो त्यांतच वाटतं.

वीरा:–वेलादेवी, तुमच्या या सॅंडबेरिअलमुळं गद्धूळ गांवच रहित झालं नाहीं, तर वल्लीचं नि विजयाबाईचं गाणं बजावणंहि रहित व्हायला लागलंय. तें कांहीं चालूं द्यायची नाहीं मी. झालाच पाहिजे हा प्रोग्राम. हं आटपा पाहूं विजयाबाई.

विजया:–मी इतका आग्रह मुळींच करून घेतला नसता वीराताई. पण परवापासून कीं नाहीं माझा आवाज (खोकते) अस्सं होतंय बघा एक सारखं. मग कसं म्हणणार मी गाणं?

वेला:–मॅग अश्यं करा त्युमी विजयाबाई. पेटी आन् घिलरुब्या आणून द्या वल्लीबाईच्या हातांत. त्यांच्यं वाजवणं सुरूं झालं कीं तुम्हाला स्फूर्ति येईल गायच्यी. ढोलगं वाज्यायला लागलं की डोंबाऱ्याची कसरत चालू होते म्हणे आप्पाप.

**वैजयंती:**–You are right Vela. हं विजै बै, घ्या तो दिल्रुबा. विरा तै, तूं पिटी आणून ठेव वल्लीबैपुढं ( वीरा पेटी आणून ठेवते. विजयाबाई दिल्रुबा खोक्यांतून काढतात. त्यास एकदोन खुंट्या व ताराच नसतात. वल्ली पेटी उघडते त्या सरशीं झुरळें बाहेर येऊन सैरावैरा पळतात. वल्लरी ई ऽऽ करून टुणकन् उडी मारते. कारण ती झुरळाला भीत असते. )

**वीरा:**–हें ग काय वल्ली! तुझ्या रोजच्या वापरायच्या पेटींत हे झुरळ कसे घर करून बसले!

**विजया:**–आणि या तुमच्या दिल्रूब्याच्या खुंट्या नि तारा कुठं फरारी झाल्या!

**वल्लरी:**–( फजिती झाकण्यासाठी कोडगेपणाने हंसून ) या मेल्या शेजाऱ्यांच्यामुळं बरं का माझ्या जिनसांची अशी नासाडी होते. आमच्या पलीकडल्या गाळ्यांत आहे एक जगदंबा. तिला आहे थोडा नाद वाजवण्याचा. सारखं मागायला येते, जरा पेटी द्या, जरा दिल्रुबा द्या म्हणून. जिन्नस समोर असला तर 'नाहीं' तरी कसं म्हणायचं? म्हणून कोठीच्या खोलींत नेऊन ठेवायला सांगितलं मी विठीला. सकाळपासून तिथं राहिल्यामुळं शिरले हे झुरळ पेटींत.

**वेला:**–आशेल बाई. आन् तिथल्या उंदरांनीं दिलरुब्याच्या तारा कातरल्या असतील. ( वैजयन्ती, वेला व वीरा एकमेकीकडे पाहून हंसतात. विजया बाजूस तोंड फिरवून वल्लरीच्या फजितीस हंसून घेते आणि वल्लरी ओशाळून खाली मान घालते. वंशी येते. )

**वंशी:**–वीरात्त्या, ए वीरात्त्या, आज गंमत झाली. इन्स्पेक्टर शाळेंत आले होते नि ते गेल्याबरोबर बाईनीं सुट्टी दिली आम्हाला.

**वेला:**–ही व्यल्लीची म्युलगी वाटवं? त्युझं नांव ग काय?

**वंशी:**–मी नाहीं सांगत जा. उगीच्याउगीच वेडावताहेत मला.

वल्लरीः–(वेलासारख्याच धर्तीनें) हें काय वंशी! कुनाशी कशं बोलायचं हें कांहीं कळत नाहीं कार्टीला. शांग नांव त्यांना आन कितव्या यत्तेंत आहेस तेंही शांग.

वैजयन्तीः–(वंशीस जवळ घेऊन व तिच्या दोहो बाजूस लोंबणाऱ्य वेण्यास गोंजारून) Oh! What lovely hair! इत्के नाजूक रेश्मी केस क्वचितच दिसतात. अन् प्रतिष्ठित लोकांत मुलींची बॉब करायची चाल पडल्यामुळं तर अशा वेण्यांची ब्यूटी पाह्यलाच मिळेनाशी झाली.

वल्लरीः–इतका का बॉब पाप्युलर झालाय!

वेलाः—तें कांहीं विच्यारू नका. सुशिक्षित आणि श्रीमंत आईबापांची एक सुद्धां छोकरी लांब केसाची सांपडायची नाहीं आतां तुम्हांला.

वल्लरीः—मीही वंशीचा बॉब करणार मग.

वंशीः—आदि मला खायला दे की मा!

वंल्लरीः—आंत जाऊन वारणाबाईकडून घे तुला काय हव्वं असेल तें, त्यांनी आज कित्ती मज्जा मज्जा केली आहे. [वंशी आंत पळत जाते] मी तुम्हाला सगळ्यांनाहि एक विनंति करतें, आपल्यासाठीं मी ब्रेकफास्टचा बेत केलाय.

विजयाः—संध्याकाळीं ब्रेकफास्ट!

(सर्वजणी हंसतात. त्याचं कारण न उमगून)

वल्लरीः—फार कांहीं केलं नाहीं आहे मी. नुसता केशरी शिरा, बटाटे-पोहे, टी नाहीं तर कॉफी आणि थोडी फरूट. आंतल्या खोलींतच टेबल मांडलंय.

वंशीः–(रडव्या चेहऱ्यानें प्रवेश करून) मला नको गं मा वारणा-काकूंचा तो उष्टा शिरा. विठी नि त्या खात बसल्या होत्या आणि त्याच हातानं मला द्यायला लागल्या.

**वारणाः**– ( प्रवेश करते ) ऐका ऐका बाईसाहेब लेकीच्या चाहळ्या. या वेळीं नि ओळ्यानं मी खाईन तरी का ? दुपारीं जेवणानंतर महाराजांच्या प्रसादाशिवाय कांहीं खायचं नाहीं हा माझा नियम माहितच आहे तुम्हाला. मग तुमचं रामाचं राज्य असेना. उष्टावायची नाहीं मी.

**वीराः**–पण वारणाबाई, तुमच्या तोंडाला शिऱ्यासारखं कायसं चिकटलेलं दिसतंय !

**वारणाः**– ( दचकून पुसते ) भाजतां भाजतां उडाला असेल बाई रवा एखाद वेळ. त्याचं काय एवढं ! झालंय बरं का सगळं तयार बाईसाहेब. सांगितलंत म्हणजे आणतें वाढायला.

**वेलाः**–व्यल्लीबाई आमी आता निरोप घेतों तुमच्या. उद्यापिद्या तुमच्याकडं पुनः येऊं तेव्हां ब्रेकफास्टच काय पण फीस्ट घेऊं चमचमीत. खरं कीं नाहीं वीरा.

**वैजयन्तीः**–शिवैय् आज अमाला धुमशानची ट्रिटमेंट करैची असल्या-मुळं कै खैचं नै आमाला. चल मग वीरातै.

( वेला व वैजयन्ती जायला निघतात. )

**वीराः**– यांना पोंचवून लवकरच येतें हं मी वल्ली, वंशीलाही जातें मी घेऊन जराशी.

( त्यांना पोंचवीत )

**वल्लरीः**– मग फीस्टीचा डे कोणता ठरवायचा तें कळूं दे हं मला. आपल्या पंक्तीला मी आणखी दहावीस बायका बोलावणार आहें. ( तिघी जातात. परत येऊन ) आता तुम्ही आम्ही तरी करूं या थोडासा फराळ.

**विजयाः**– अहो पण आपल्याला तरी आज फराळ करून कसं चालेल वल्लरीबाई. आपल्यालाही धूमशानची ट्रीटमेंट घ्यायची आहे. खाऊन कसं चालेल !

विठीः– पेले बशा गलासं समदं मांडलं. वाडायला घेऊं देत का वारणाबाई आतां !

वल्लरीः– फराळाचा बेत रहीत झाला. जिन्नस झाकून ठेवून तुम्ही आपल्या पुराणाला जा असं सांग वारणाबाईला. आणि इकडं दोन ग्लास आणि पाणी आण.

विठीः– जी ( जाते ).

विजयाः– ( धुमशानची बाटली पहात ) पण हें औषध घ्यायचं कसं वल्लरीबाई ?

वल्लरीः– अहो त्यांत काय आहे ! ग्लासांत ओतून ड्रिंक करायचं.

विजयाः– ड्रिंक की नुसतं गार्गल ? विचारून घ्यायला हवं होतं तुम्ही वीराताईंना.

वल्लरीः– मग थोडं गार्गल नि थोडं ड्रिंक असं करूंया. कशानं का हुईना गुण आला म्हणजे झालं. ( विठी पेले पाणी आणून देते. औषध ग्लासांत घेऊन दोघी तोंडांत ओततात. तों 'ओऽय् ! मेलें गं बाई ! फू फू ' करायला लागतात ! )

विठीः– ( दचकून ) अगाईऽ ! या जीवबीव देणार हैती कीं काय तरी !

( पडदा. अंक २ रा समाप्त )

# अंक ३ रा

[ वेळ—सकाळीं ८-९ ची. स्थळ—वल्लरीबाईचें घर-माजघर. कॉटवर गादी, त्यावर उशागतीं तक्क्यासारख्या उशा ठेवलेल्या असून वल्लरीबाई त्यास टेकून बसलेल्या आहेत. त्यांचा चेहरा पारोसा दिसतो. कपाळावर एखादी बट अस्ताव्यस्तपणें सुटलेली, कुंकु पुसलेलें, ओठ, हनुवटी, गाल यांवर पट्ट्या चिकटलेल्या, असा थाट. वल्लरीच्या चर्येवर कमालीची उदासीनता. ]

वल्लरीः—( क्षीण स्वरांत ) विठे, ए विठाबाई ! ( क्षण दोन क्षण वाट पाहून व कोणी ओ देत नाहीं असा अनुभव येऊन ) आज झालंय काय यांना ? वंशा ! ए वंशू !

वंशीः—( आंतूनच ) काय ग मा ?

वल्लरीः—तिकडूनच काय विचारतेस ? ( काकुळतीनें ) जरा इकडं ये ना राजा ?

वंशीः—( आंतूनच ) मी नाहीं येत जा. मला उतारा लिहायचाय अजून.

वल्लरीः—असं ग काय करतीस ? ये ना इकडं जराशी. कपाटांतली तेवढी अमृतांजनाची डबी मला काढून दे ग ! माझं डोकं सारखं ठणकायला लागलंय बघ. आणि उभं सुद्धां रहावत नाहीं आहे मला.

वंशीः–( पुढं येऊन ) मग मी काय करूं त्याला ? एकदां सांग काय हवंय तें ? ( कपाटांतली अमृतांजनाची डबी काढून देते ) पुन्हां पुन्हां त्रास नको देऊंस मला.

वल्लरीः–अगदींच कशी ग माया नाहीं तुला आईची ?

वंशीः–तुला तरी कुठाय माझी माया ? मला परवां ताप आला होता, तर मला तश्शी टाकून गेलीस ती विजयाबाईबरोबर कुठलंसं प्रदर्शन बघायला ! विठी मला कसलंतरी कडू औषध आणून पाजायची आणि वारणाबाई भात भरवायच्या ओकारी आली तरी. मला रडायला यायचं अन् तुझ्या कुशींत गप्प पडावं असं वाटायचं. पण तुला कुठं हवीय मी ? मग मी तरी कां तुझं हें करावें ?

वल्लरीः–( पराजित सुरांत ) नको बाई करूंस. पण विठीला तरी बोलावशील का इकडं ? ( वंशी आंत जाते. वारणाबाई प्रवेश करते ) वारणाबाई, जरा लवकर आलां असतां तर बिघडलं असतं नाहीं ? मला बरं वाटत नाहीं हें ठाऊकच नसेल तुम्हांला ?

वारणाः—तें कसं कळल्याशिवाय राहणार ? आपल्या हातानं दुखणीं ओढून घ्यायचीं त्याला लोकं काय करणार ? तुमच्या त्या जपानी धूमशानची गंमत मीं मठांत बायकांना सांगीतली तेव्हां हसून हसून मुरकुंडी वळली सान्यांची ! वळकटहट्टीची व्यंकुबाई म्हणाली, ‘ भाळ छलु झाली ! शाणी शाणी म्हणून मिरवणाऱ्या आवा कशी हुच्चपणा करती तें कळलं.’

वल्लरीः—चांगल्या जागतांय हो खाल्या अन्नाला वारणाबाई ! माझी निंदा करत फिरतांय गांवभर ? आणि वरती सांगतांय आपल्या तोंडानं निलाजऱ्यागत ? इश्श !

वारणाः—तोंड संभाळून बोला वल्लरीबाई. मला निलाजरी म्हणायचं कारण काय आहे तुम्हाला ? खाल्लेल्या अन्नाला जागायच्या गोष्टी सांगतांय,

तें अगदीं फुकटच्च खायला घालत असाल कीं नाहीं? मरमरेपर्यंत राबवून घेतां तें कसं राहील लक्षांत? आणि खाऊन खाऊन मी खातें किती? एवढा भात आणि अर्धी भाकरी खाईपर्यंत जीव गोळा होतो माझा. आतां वाटीभर दूध घेतें कधींतरी अन् पित्त उठतं म्हणून लोणी खडीसाखर घ्यावी लागते एखादवेळ. ती दाखवा उच्चारून म्हणजे सुटलां. आम्ही मेल्या बायकाच कर्मदळिद्री. केलेल्या कामाचं कधीं म्हटल्या कध्धीं चीज व्हायचं नाहीं. (हेल काढून) तुमचा दोष नव्हे हा बाईसाहेब! आमचं नशीबच तसलं. देवा, कधी संपविणार रे बाबा या यमयातना?

**वल्लरी:**–(भीक नको पण कुत्रें आवर अशी अवस्था होऊन) असं काय करतां वारणाबाई! मी कांहीं तुमच्या मनाला लागावं म्हणून मुद्दाम म्हटलं नाहीं. उठा बघूं. आधीं जाऊन चहा करून घ्या. नाहींतर डोकं दुखायला लागेल तुमचं.

**वारणा:**–आतां काय राहिलंय दुखायचं? फुटून चिंध्या व्हायची वेळ आलीय. पण कुणाला कळणार आहेत आम्हा भिकारड्यांच्या यातना?

**वल्लरी:**–इतकं कां दुखतंय तुमचं डोकं वारणाबाई? मग हें आधीं नव्हतं कां सांगूं? आतां असं करा आगोदर थोडा मोरावळा खा. अन् मग चहा करा. मलाहि द्या हं आर्धा कप आणून. बघतें घेववतो आहे का?

**वारणा:**–तुमचं पहिलं बोलणं ऐकल्यावर दुसरी एखादी बाई आवंढा परतायला राहिली नसती इथं. पण तुम्हाला अशा आजारी टाकून जायचा दुष्टपणा माझ्या हातून कांहीं होईना. बरं. तुमचं तोंडबिंड धुणं तरी झालंय का? नाहीं? मग घ्या बरं आधीं तें उरकून? तुमचं तोंड धुवून होईपत्तर आणतें मी चहा करून? चला, मी पोचवतें तुम्हाला न्हाणीघरांत (वल्लरीस उठवून हातास धरून आंत नेते. दुसरीकडून विठी प्रवेश करते.).

विठी:–या बयाच्या मनांत हाय तरी काय? पर काय कां आसना! आपला फायदा हाय तर त्यो आपुन कशापायीं बुडवायचा? (हलक्या आवांजात टाळी वाजवून शुकशुक करून बोलवते. वारणाबाई येते.)

वारणा:–काय ग? काय कादलं आहेस हं चोरटं काम? (दोघींची थोडी कुजबुज होते)

विठी:–मग चल बघूं? अत्ताच्या अत्तां गेलं पाहिजे.

वारणा:–अग पण निसटायचं कसं इथून?

विठी:–काढा कीं कायतरी शक्कल. मी शिकवूं व्हय तुमास्नी? भागलंच मग. तुमच्यासंगट मला बी सोडवा.

वारणा:–(थोडा विचार करून) हं असं करायचं विठे आतां. (तिच्या कानांत कांहीं सांगते) कळलं?

विठी:–कळलं कीं. अन् माझ्यापुरतं सांगितलांसा तें खासं हाय. पर तुमची भावजय मेल्याचं वंगाळ खोटं कसं बा बोलूं मी?

वारणा:–त्यांत ग कशाचं आलंय वंगाळ? मला मुळीं भाऊच नाहीं. मग त्याची एकदां सोडून शंभरदां बायको मारायला आपलं काय जातंय? आणि तुला सांगायला कुठं सांगतेंय मी? तें तूं मला आधीच सांगितलं आहेस असं समजून मी जें पुढचं नाटक करीन त्याला तूं साथ करायची. न हंसतां हं? (वल्लरीबाई खोंकल्याचा आवाज येतो) विठे, सावध! (दोन्ही गुढघ्यांत डोकें घालून मुसमुसूं लागते व वल्लरीबाई आल्याची चाहूल लागतांच) वैनी! कशी ग सोडून गेलीस माझ्या दादाला? विठे, मेले कसली ग बातमी आणलीस ही!

विठी:–(सान्त्वनाच्या सुरांत) आतां रडून काय हुनार वारणाबाई! देवानंच दोरा तोडल्यावर कुणाचं काय चालनार?

वल्लरी:–(बावरून) हें काय वारणाबाई! विठे, काय झालं ग!

वारणा:–(नुसते जोरजोरानें हुंदके देते.)

वल्लरी:–सांगितलं नाहीं तर काय समजावं माणसानं?

विठी:–काय सांगणार बापडी? हिच्या जन्माचं असं वाटुळं झाल्यालं. भावाचं भरल्यालं घर बगुन आपलं दुक् गिळून हुती बिचारी! पर द्येवाला नाय बघवलं त्यें. भावजय आडांत पडून मेली एकाएकी. भावाकडला मानुस सांगावा घेऊन आलाया.

वल्लरी:–हात्तिच्या! एवढंच ना! (भलतंच बोलून गेल्याची जाणीव होऊन जीभ चावते.) फार वाईट झालं वारणाबाई. पण आतां शोक करून का येणार आहे वैनी परत? उठा आतां, चहा घ्या, नाहींतर जास्तीच कपाळ दुखायला लागेल तुमचं.

वारणा:–कशाला मेला चहा आतां? विठे, दादाचा गडी घरीं बसलाय म्हणतीस? बघतें तरी एकदां कायकाय कर्मकथा सांगतोय ती? वैनी वैनी गऽ (हेल काढून पण प्रेक्षकांकडे हसत हसत आंत जाते)

वल्लरी:–विठे तूंच कर आतां सारं. आधीं चहा दे करून.

विठी:–पर बाईसाब, आज मला कामाला यायला होत नाय म्हणून रजा मागायला आलेंय मी.

वल्लरी:–तुलासुद्धां आजच आठवली रजा?

विठी:–मला काय हौस होती बाईसाब! पण नशीब वाढून आणतंय कीं एकएक खटलं. माझ्या मावळणीच्या नरड्यांत कायसं अडकलंय अन् तिला इस्पितळांत नेलंय. तिला बगुन तरी नग यायला बाईसाब? बामणाच्या शिकलेल्या अन् शिरमंत बायांना आपलं मानुस मरायला लागलं तरी माया येत नाय म्हनत्यात. आमाला आपल्या मानसाचं काय वंगाळ ऐकलं कीं अनपान्याची बी सै होत नाय. बाईसाब, घशांत अडकल्यालं भेर निघालं अन बरं वाटलं मावळणीला मंजे येईन मी लगेच. (वारणाच्या पद्धतीनें जाते.)

वल्लरी:-आतां करूं तरी काय म्हणतें मी!

वंशी:-(गाणें म्हणत येते)

साताभाताचा गुंता गुंता। सखे ग।
साताभाताचा गुंता गुंता॥
वैनींचीं तोंड पारोशीं। सखे ग। वैनींचीं०।
वन्संच्या द्वाड खोड्या। सखे ग। वन्संच्या०॥
लाड्वांनी तांबे भरले। सखे ग। लाड्वांनी०॥

वल्लरी:-वंशी, तोंड बंद कर बघूं? आधींच कपाळ ठणकतंय त्यांत तुझी वटवट.

वंशी:-आज मला खायला देणार आहेस कीं नाहीं तूं मा! ते बघ नऊ वाजले!

वल्लरी:-किनई, बहिरूला घेऊन ये बोलावून. त्याला भाजेकर बोर्डिंगा-तनं डबा आणायला सांगते. मग जेव हं तूं.

वंशी:-सांगायचं विसरलेंच तुला मा, बहिरू किनई 'पावण्याच्या मातीला जातों' असं सांगून गेला घाईघाईनं मघाशींच. तुला सांगायला त्यानं मला सांगितलं होतं. पण मा, मातीला जायचं म्हणजे ग काय?

वल्लरी:-तुला काय करायचंय तें घेऊन?

वंशी:-हें ग काय मा? कांहीं विचारलं तर असंच करतेस. खाय-प्यायला तर कधी देतच नाहींस, पण कांहीं विचारलं तर फुकटचं सांगणंसुद्धां जिवावर येतं तुझ्या. सांग कीं ग?

वल्लरी:—अग, मातीला म्हणजे सत्यनारायणासारखी एक पूजा असते.

वंशी:—खरं? सगळ्यांची करतात तशी?

वल्लरी:—होय ग.

वंशीः–मग तुझीसुद्धां व्हायची आहे ती? कधीं व्हायचीय ती सांग कीं. आणि कुणाकुणाला बोलवायचं तुझ्या मातीला?

वल्लरीः–आतां करूं तरी काय कार्टे तुझ्या तोंडाला म्हणतें मी?

वंशीः–माझ्या तोंडाला कशासाटीं काय करणार तूं? तुझ्या तोंडालाच तें धुमशान झालंय त्याला लाव कांहींतरी मलम नाहींतर आयडिन.

(विजयाबाई येते. तिच्याही तोंडाला पट्या असतात.)

विजयाः–काय हितगूज चाललंय मायलेकींचं? अन् हें ग काय वंशी! आज अजून वेणीसुद्धां झालेली दिसत नाहीं?

वंशीः–आज विठी नि वारणाकाकू आल्यात कुठं अजून? माझं वेणी अंगधुणं त्यांच्याकडं असतं.

वल्लरीः–विजयाबाई, आज गडीमाणसं सारीं संप केल्यागत निघून गेलींत. कुणाचं कोण मेलंय तर कुणाचं कोण इस्पिताळांत पडलंय. माझी तर ही तऱ्हा होऊन बसलीय! नुसतं बसलं तरी घेरी येतेय. तुम्हाला सांगूं नये मी खरं म्हटलं तर, पण सांगतेंच. वंशीला तुमच्याइथं नेऊन तिचं वेणी आंगधुणं करा अन् जेवायलाहि घालून शाळेला पाठवा तुमच्या शालीशामुबरोबर.

विजयाः–मुलींच्या वेण्यांचा हा असा घोळ पडतो. म्हणून बॉबची चाल सुशिक्षित माणसं पाडूं लागलीं आहेत. ऐकलंच आहेत तुम्ही परवां. आणि वंशीचा बॉब कातरायचा बेतही झालाय तुमचा.

वल्लरीः–पण हे बेत अमलांत येईपर्यंत तरी हवीच कीं वेणीफणी!

विजयाः–पण याला चालढकल हवीच मुळीं कशाला? आजच्याआज टाका कीं कातरून. मी आमच्या शिपायाबरोबर देतें धाडून सलूनांत. तो अगदीं बरोब्बर करून पोंचविल हिला परत. मग नेऊं? चल वंशी, बॉब कातरायला.

वंशीः–बॉब म्हणजे ग काय मा?

वल्लरीः-लागलीस का पुनः चांभार चौकशा करायला ?

विजयाः-हें बघ किनई वंशी, बॉब म्हणजे मुलांसारखे मुलींचे केस कातरायचे. केस लांब असले म्हणजे वेणी घालायचा त्रास लागतो मागं. शिवाय वेण्या सुटतात. विसकटतात अन् बटा डोळ्यावर येतात.

वंशीः-मग आल्या म्हणून ? कपाळावर सुटलेल्या बटाच मला सुरेख दिसतात असं बापु म्हणतात. मी नाहीं बाब करून घेत जा. तूंच घे करून घाटलं तर मा. तुझेच केस आलेत बघ सुटून कपाळावर.

वल्लरीः-कार्टी सांगितलेलं सरळ ऐकेल असं व्हायचंच नाहीं कधीं. काय लागतां तिच्या तोंडाला विजयाबाई ? रट्टयाला धरून फराफरा ओढत न्या, बॉब करा आणि गिळायला घालून......

विजयाः-पण वल्लरीबाई, तीच तर पंचाईत झालीय आज. यांना जायचंय कुठंसं फीस्टला. माझ्या तोंडाची ही दशा झाल्यामुळं मला कांहीं खाववत नाहीं कीं गिळवत नाहीं; म्हणून माझंही जेवण नाहीं आज. मग मुलांसाठींच कशाला स्वैपाकाचा पसारा घालायचा ? स्वैपाक लावला करायला कीं, पोरं खाणार मूठभर आणि तो मेला म्हाराज करणार पांसरीचा चट्टामट्टा. म्हणून मी आज त्याला सुट्टीच टाकली देऊन. आणि शामूशालीला दोनदोन आणे देऊन रेस्टोरांमधें कांहींतरी घेऊन खा अन् शाळेला जा म्हणून सांगितलं. मग काय करूं मी वंशीला नेऊन ?

वंशीः-आणि मी नेलंत तरी यायची नाहीं तुमच्या इथं, तो बाब कीं फाब करून घ्यायला. आणि बरं कां ग मा, यांची ती शालीट्ली भारी वेड्ट आहे ग ! उगीचच्या उगीच भांडते माझ्याशीं.

विजयाः-तर ग ! तूं मोठी धर्मराजाचाच अवतार कीं नाहीं ? कधींग भांडली आमची शाली तुझ्याबरोबर ?

वंशीः-माझ्याबरोबरच कां ? तुमच्याबरोबर सुद्धां भांडते ती. किनई मा, सिनेमाला जायसाठी यांच्याकडं पैसे मागितले तिनं अन् यांनीं 'नाहीं'

म्हटलं तर ' आईट्ली, म्हारीण ' अशा शिव्या दिल्यान् तिनं ह्यांना अन् फडताळांतले पैसे घेऊन वेडावून दाखवत धुंमा पळून गेली बघ. अन् मा, यांचा शाम्यासुद्धां रावसाहेबांच्या टेबलांतल्या शिगरेटी चोरून ओढतो. म्हणून मी नाहीं जायची त्यांच्या घरांत. त्यापेक्षां मी आपली काकूकडंच जातें.

वल्लरीः–जा बाई कुठं हव्वं तिथं, मला नकोस आतां छळूं.

( वंशी जाते )

विजयाः–अलीकडच्या मुलांच्या खस्ता खायच्या म्हणजे महाकर्म कठिण झालंय हो बाई! भाग्य तुमचं म्हणून एकच रिपु आहे तुम्हांला. माझ्या राशीला दोन आहेत मेले कर्दनकाळ.

वल्लरीः–उगीच हळहळून करायचं काय विजयाबाई ? आलंय नशीबाला तें भोगलं पाहिजे. बरं पण आणखी एक काम आहे तुमच्याकडं. मला किनई शंभर रुपये हवे आहेत थोडे दिवस. हे आले गांवाहून कीं लगेच परत करीन तुमचे.

विजयाः–इतके पैसे हो कशाला एकदम वल्लरीबाई ? कांहीं खरेदी व्हायचीय वाटतं नवी ?

वल्लरीः–खरेदी काय करतेय कपाळ ? तुमच्या नादानं तो सोनेरी फ्रेमीचा चष्मा घेतला अन् गढुळगांवासाठीं मोटार ठरवली होती चाळीस रुपयांला. जाणं तर घडलंच नाहीं, पण पैसे मात्र बसले डोक्यावर. तो मोटारवाला आणि चाळशीवाला बसलेत धरणीं धरून. संध्याकाळच्या आंत पैसे चुकते केले नाहींत तर हालणार नाहीं दारांतून असं तणतणून गेले आहेत ते! माजुरी झालींत मेलीं माणसं आतांशा. हे झाले ऐंशी रुपये आणि दुकानदाराचेही झालेत पन्नास तरी. पण इतके एकदम न देतां पंधरा वीस रुपये तोंडावर टाकले तरी तूर्तास गप्प बसेल तो. मग देतां ना ?

विजया:–पण एवढ्यासाठीं माझ्याकडं कशाला हवं तुम्हाला मागायला? तुमची पर्स बघा कीं झाडून! सहज निघतील दोन चारशे.

वल्लरी:–दोनचारशे दिडक्या निघाल्या असत्या यावेळीं तर आनंदानं उड्या मारल्या असत्या मी. विजयाबाई, तुम्हाला का सांगायला हवं मी? अलीकडच्या आम्हां विदुषी म्हणवून घेणाऱ्या बायकांच्या पर्सा म्हणजे वरून थाट आणि आंतून नाट अशा असतात. जुन्या बायकांच्या पुरचंड्या दिसयच्या नाहींत कधीं कुणाला. पण सोडली गाठ कीं दहावीस रुपयांच्या चवल्या पावल्या हमखास निघायच्या. मग घरीं गेल्याबरोबर द्या हं पाठवून तुमच्या शिपायाच्या हातीं?

विजया:–मी आलेयं ज्याच्यासाठीं त्याच्या अगदीं उलट गाणं काढलं आहेत तुम्ही हें वल्लरीबाई.

वल्लरी:–म्हणजे!

विजया:–मी तुमच्याकडं आलें होतें ती माझी बाकी मागायला.

वल्लरी:–तुमची बाकी! अन् ती कसली बाई!

विजया:–अहो, परवाच्या दर्शनपूर ट्रिपची.

वल्लरी:—दर्शनपूर ट्रिपची! तिकिटाचे पैसे तर माझे मीच दिलेत. भोजन डेलीगेट फी सुद्धां त्या वेळच्या त्या वेळींच दिलीय. तिथं मी जिन्नस पान्नस घेतले ते माझ्या पर्समधल्या पैशानं. आणि मग हो कशाची बाकी काढलीत?

विजया:—माझ्या सुद्धां नव्हतं हो लक्षांत. पण परवां अकाउंट करून बघतांना उमगलं. येतांना भुतई स्टेशनवर आपण चहा मागवला होता त्या वेळचा दीड आणा राहिलाय तुमच्याकडं आणि वेताळवाडी स्टेशनवरल्या शेंगा सोलाण्याचे चार पैसेहि मीच दिले आहेत. आठवतच असेल तुम्हांला?

वल्लरी:—होय बाई! राहिलेत खरे दोन आणे द्यायचे. आणि तुम्ही मला सोबत केलीत प्रवासांत अन् आपल्या मोठेपणाच्या बढाया सांगून मला प्रवासाचा कंटाळा येऊं दिला नाहींत, त्याबद्दलची फी म्हणून कांहीं आकारायचं असलं तर आकारा. एकदमच कळूं दे तुमचं किती रिण झालंय् तें!

विजया:—वल्लरीबाई, तुम्ही मला टोंचून बोलतां हें कळतंय. पण देणं नि दुखणं माणसाला आवडणार थोडंच? पैसा द्यायची वेळ आली कीं राग यायचाच कुणालाहि. पण हिशेबाला चोख असायचं असं माझं तरी ठरलेलं प्रिन्सिपल आहे. अडाणी बायकांसारखा अंधळा कारभार आम्ही विदुषींनींहि करायचा म्हणजे—

वल्लरी:—चार बायकांत गेल्यावर पैशाकरतां जीव कासावीस करणं म्हणजे हिशेबीपणा म्हणत नाहींत, तर कंजुषपणा आणि मनाचा हलकेपणा म्हणतात, हें कोणत्याहि विदुषीला कळायला हवं. तुम्ही इतक्या ह्या असाल अशी मला नव्हती बाई कल्पना. अन् आतां तुमचा कद्रूपणा अनुभवाला आल्यावर मी तरी कशाला बसूं स्वस्थ? तुम्हीहि माझ्या डब्यांतली पावडर फासून घेतलीत मुखड्याला, माझ्या कंगव्यानं तीन तीनदा केशरचना विंचरल्यात आणि माझ्या डबींतली सुपारी नि लवंगा वेलदोडे बकणलेत. या साऱ्याचे आठ आणे झालेत. तुमचे दोन आणे वळते करून बाकीचे सहा आणे टाका आत्तांच्या आतां? आधीं पैसे टाका तर बाहेर पडा माझ्या घराच्या.

विजया:—मुद्दाम आडरानांत शिरायचा अडाणीपणा केलात तरी माझे दोन आणे नाहीं सोडायची मी.

वल्लरी:—दुसऱ्याला आडाणी म्हणून आपला विदुषीपणा थोडाच सिद्ध होतोय? या विदुषीपणाच्या दिमाखाला भिऊन माझे पैसे मी थोडीच सोडायला बसलेंय? माझे सहा आणे रोख मोजले पाहिजेत तुम्ही.

विजयाः-( उसळून ) मोजतेय ! वाट बघा ( तिथें टिपॉयवर असलेली कप बशी उचलून ) तुम्हाला माझे दोन आणे द्यायचे नाहींत ना ? नका देऊं. ही कपबशी नेतें म्हणजे झालं. ( घेऊन जाऊं लागते. वल्लरी हेलपाटतच तिचा दंड पकडते. )

वल्लरीः-अग वाग तुझी डाकूगिरी ! तुझ्या सवाई वस्ताद आहे मी. ठेव ती कपबशी मुकाट्यानं.

विजयाः-मुळींच नाहीं ठेवायची. एक इंग्रजी शब्द धड बोलायला येत नाहीं अन् खुळचट मस्ती करतेय माझ्याशीं. चल हो दूर मुकाट्यानं. ( तिला ढकलते. वल्लरी कोलमडून पडतां पडतां तिचा बुचडा धरते तों वेणींतलें पावलीएवढें फूल व दोन आंकडे हातांत येतात. )

वल्लरीः-जा खुशाल घेऊन तीं खापरं. हें सोन्याचं फूल आलंय माझ्या हातांत.

( नंतर फूल काढून घेण्यासाठीं विजयाबाई झोंबाझोंबी करते, ती सहन न होऊन केवीलवाण्या आवाजांत )

अहो धांवा हो कुणीतरी ! ही कैदाशीण घरांत घुसून जीव घेती आहे माझा.

( त्याच वेळीं वीरा प्रवेश करते )

वीराः-काय झालं ग वल्ली ! दिवसां दरवडे आणि खून ! मोंगलाई आहे किं काय ही !

विजयाः-( चमकून उठून ) तुम्हीच सांगा वीराताई, हें शोभतं कां वल्लरीबाईंना ?

वल्लरीः-आणि दोन आण्याच्या पसड्यांसाठीं बरोबरीच्या बाईचा जीव घ्यायला उठणं हें शोभत असेल नाहीं यांना ? आणि म्हणे बी. ए. झालेली विदुषी ! तूंच सांग वीराताई, यांनीं दोन आण्यासाठीं घरणं धरल्यावर मी तरी माझे सहा आणे का म्हणून ग बुडवायचे ?

वीरा:—म्हणजे दोन आणे अन् सहा आणे—म्हणजे आठ आणे—बत्तीस पैसे! यासाठी का हें अँग्लो-जर्मन युद्ध जुंपलं? आणि घटकेपूर्वी गळ्यांत गळा घालणाऱ्या या विदुषी एकमेकींचे गळे दाबायला लागल्या! आठ आणे! बत्तीस पैसे! अन् विदुषींची झुंज?

विजया:—पैशाचाच केवळ प्रश्न नाहीं हा वीराताई. प्रिन्सिपलचा प्रश्न आहे हा. दोन आण्यांची मला काय किंमत आहे खरं म्हटलं तर? सार्वजनिक कार्यांच्या, ह्याच्या नि त्याच्या वर्गण्यासाठीं जिथं माझे शेकडों रुपये जातात——

वल्लरी:—आहे ठाऊक केवढा उदारपणा आहे तो. स्वत: वर्गणी भरून स्त्री मासिक घ्यायचं तर डोळे पांढरे होताहेत, अन् सांगताहेत शेकडों रुपयांच्या गोष्टी!

विजया:—स्त्री मासिक घेतलं नाहीं म्हणून माझ्या इतर वर्गण्या कांहीं चुकत नाहींत. मला मराठी मॅगीझिन्स फारशीं आवडत नाहींत.

वल्लरी:—आवडत नाहींत म्हणूनच पंधरा तारखे दिवशीं पोस्टमन यायच्या वेळेला नेमक्या येऊन बसतां वाटतं माझ्या इथं? त्यानं अंक टाकला रे टाकला कीं घातलीच यांनीं झडप गिधाडासारखी. नुसत्या वर्तमानपत्रावर आणि मासिकावर भूक भागते या गिधाडाची असं नको समजूं तूं वीराताई. एकदां काय झालं बघ, प्रांतसाहेब नर्मदे आले होते इथं. त्यांच्या बायकोच्या हातांत पायांतली वहाण बघीतली मीं.

वीरा:—प्रांताच्या बायकोनं पायांतली वहाण हातांत कां घेतली? तुला बघून?

वल्लरी:—चेष्टा ग कसली करतेस? ‘पायांतली वहाण’ म्हणजे कादंबरी आहे— ती मी आणवली. आलेल्या दिवशींच या बयाबाईनीं ती पळवली आहे. अन् परत आणून द्यायची अजून आठवण होतेय का विचार?

विजया:—आणि या माझीं पुस्तकं लांबवीतच नसतील जशा कांहीं! सिनेमाला गेल्यावर संवाद गाण्यांचं पुस्तक मी घ्यायचं अन् तें वल्लरीबाईनीं लांबवायचं हें ठरल्यागत झालंय. मी आठवणीनं मागून न्यावं तेव्हा

मला मिळायचं. अहो, आटवड्यापूर्वी मॉटगामेरीचा भला जंगी कॅटलॉग आलेला यांनीं आणला उचलून! आपली चोरी पचवून दुसऱ्याची बरीक तोंडफोड करायची!

**वीरा:**–पण यांत दोघींचीही तोंडफोड झालेली दिसतय! दोघींच्याही तोंडावर पट्यांची आरास एकदम हो कशी!

**विजया:**–तुमच्या त्या मेल्या घुमशानचा बरं घुमशानचा प्रसाद आहे हा!

**वीरा:**–म्हणजे प्यालां बिलां कीं काय तरी तें ॲसिड तुम्ही!

**वल्लरी:**–मग? तूंच सांगितलंस ना तें गळ्यावर औषध आहे म्हणून?

**वीरा:**–मग खरंच आहे तें. वाटीभर खोबरेलांत थेंबभर घालायचं अन् बाहेरून चोळायचं गळ्याला. तुम्ही प्यालां तें! मेला असतां कीं बायांनों!

**वल्लरी:**–अग पण अगोदरच सांगितली असतीस तर ही वापरण्याची रीत?

**वीरा:**–मला वाटलं तुम्हांला माहीत असेल. या विजयाबाई म्हणाल्या-सुद्धां हें औषध त्यांना ठाऊक आहे म्हणून.

**वल्लरी:**–यांना ठाऊक नाहीं अशी गोष्टच नाहीं दुनियेंत! पण खरं म्हणजे शुद्ध दगड आहेत. माहीत नसतांना माहीत आहे म्हणून इंप्रेशन मारायला जातात अन् अशी फजिती करून घेतात एकेक वेळ! मागं एकदां प्रवासावरुन गोष्टी निघाल्या महिलामंडळांत. ज्या प्रेक्षणीय स्थळाचं नांव निघावं तें मी पाहिलंय म्हणून यांनीं बढाई मारावी. पण हा फुगा पुळ्याच्या गणपतीनं फोडला! त्या गणपतीच्या अंगभर पुळ्या उठलेल्या आहेत ही यांची माहिती ऐकून सगळ्या बायका खो खो हसायला लागल्या!

**विजया:**–चहाडखोर! वल्लरीबाई, तुम्ही ह्या इतक्या असाल असं नव्हतं वाटलं मला. तोंड बघूं नये तुमचं कधीं. (रागानें जाते.)

वल्लरी:—खुश्शाल जा, कुणाचं खेट्टर नाहीं अडायचं तुझ्याविणं. (वीरा-हसते.)

वीरा:—तुम्हां विदुषींचं हें समरांगण फार मजेदार झालंय वैनी. गेल्या दोन दिवसांच्या ट्रिपमध्यें आम्ही जितकी परोपरीची मौज पाहिली त्याहूनहि ही मजा कांहीं और आहे. सांगतेंच जाऊन मी वेलादेवी नि वैजयंती राजांना. (जाऊं लागते)

वल्लरी:—अहो पण वीराताई— मला किनई थोडा चहा—

वीरा:—(तें न ऐकल्यासारखें करून) घटका भरांत येतें ग परत. मला एकादी मजेशीर गोष्ट कळली कीं माझ्या मैत्रिणींना सांगितल्याशिवाय मला राहवतच नाहीं बघ. (जाते)

वल्लरी:—(अत्यंत हताशपणें) आज मला घोटभर पाणी तरी मिळणार आहे कीं नाहीं! बसवतसुद्धां नाहीं अन् त्या मेलीनं घुसळा केला माझा. तेव्हांपासनं तर घाबरल्यासारखं होतंय सारखं! करूं तरी काय आतां? राहतें झालं पडून. यांतच जीव गेला तर सुटेन एकदांची. (तोंडावर चादर ओढून अं अं आई असें कण्हावयास लागते. तोंच थर्मास व सोवन्यांत झांकून घेतलेल्या पातेल्यासह वत्सलाबाई येते.)

वत्सला:—वल्लरीबाई!

वल्लरी:—(तोंडावरलें पांघरुण बाजूस करून वत्सलाबाईच्या दर्शनानें भरून आलेल्या आवाजानें) कोण! बा-ई! तुम्ही आलांत! (पुढें बोलवत नाहीं)

वत्सला:—(पातेलें खालीं ठेवून वल्लरीच्या उशागती जाऊन बसते, व वत्सलतेनें तिचे डोकं चेपूं लागते.) वंशीनं सांगितलंन मला सगळं म्हणून लगेच आलें चहा घेऊन. थांब हं. पाणी आणतें चूळ भरायला (उठूं लागते, वल्लरीबाई तिचा हात धरून बसवते)

वल्लरीः–( हुंदके दाबीत पण अश्रुविमोचन करीत ) उठूं नका बाई तुम्ही–मला चहा नको कांहीं नको–नुसत्या बसा माझ्याजवळ. तुमचा हात तेवढा असूं दे माझ्या कपाळावर.

वत्सलाः–फार का ग दुखतंय डोकं? त्यानंच चहा नको वाटत असेल. पित्त बरं, हें पित्त. मला आलाच होता संशय म्हणून तर मात्रा आणलीय मोरावळ्यांतून उगाळून. ती घे म्हणजे बघ कसं कपाळ दुखायचं राहतंय हां हां म्हणतां! मग चहाहि घे. तुम्हा अलिकडल्या शिकलेल्या मुलींना चहा घेतला नाहीं तर कपाळशूळ सुरूं होतो. मात्रा नि चहा घेऊन झाला कीं छान होईल हं! अग रडतेस काय अशी लहान मुलीगत? एवढ्याशा कपाळदुखीनं तूं रडायला लागलीस—

वल्लरीः–कपाळदुखीनं नाहीं मी रडत बाई. मला रडायला येतंय तें माझ्या मूर्खपणामुळं—–नव्हे दुष्टपणामुळं ( हुंदका अनावर होऊन ) आणि बाई, तुमच्या प्रेमळपणामुळं—–बाई, मला चहाऐवजी चाबुक आणला असतात तर—

वत्सलाः–आतां तोंड बंद कर बघूं अगोदर. वेडी कुठली! ( उठून पाणी आणते. कपांत चहा ओतून मोरवळ्याची वाटी घेऊन पुन्हां तिच्या उशागती बसते ) हं चूळ भर. या पातेल्यांतच टाक. उठूं नको.

वल्लरीः–( उठून ) नको बाई! तितकं कांहीं होत नाहीं मला. ( तपेली घेऊन जाते व चूळ भरून परत येते. वत्सलाताई तिच्याबरोबर असतेच. तिची चूळ भरून होतांच हात तोंड स्वतः सोधन्यानें पुसते. )

वत्सलाः–आधीं चहा घेतेस कीं मात्रा? चहाच टाक घेऊन. आधींच निवला असेल– शिवाय मोरावळ्यावर गोडही नाहीं लागायचा.

वल्लरीः–बाई, तुमच्या हातचा सातासिळा चहा देखील अमृतासारखा गोड लागेल मला. बाई! बाई! काय म्हणूं हो मी तुम्हाला? ( झटकन् गुडघे टेकून वत्सलाबाईच्या पायांवर डोकं ठेवते. त्याच वेळीं वीरा, वेला,

वैजयन्तीचा हात धरून येतात. या वेळीं वेला-वैजयन्ती आपल्या खरोखरीच्या साध्या पोषाखांत येतात व कसलेहि विलक्षण आविर्भाव न करतां सरळ भाषेत बोलतात. )

**वत्सला**:–अग चालवलं आहेस काय तूं हें! डोकं फिरलंय आज तुझं!

**वीरा**:–नाहीं वैनी, फिरलेलं डोकं ताळयावर यायला लागलंय आज. वल्लरीवैनी, ठेव, अगदीं भक्तिभावानं या माउलीच्या पायावर डोकं ठेव. पश्चात्तापाच्या अश्रूनं त्या पवित्र पायावर अभिषेक कर आणि विदुषींच्या संगतीनं आणि विदुषीपणाच्या लोभानं मरून गेलेली माणुसकी पुनः जिवंत होऊं दे असा आशिर्वाद माग.

**वत्सला**:–( वल्लरीस उठवून व पोटाशीं धरून ) आतां असलं भलतं सलतं करत बसलीस तर मी रागावीन अन् चालती होईन बरं का. तूं एक शहाणी अन् तुझ्या मदतीला या दीड ,शहाण्या आल्या आहेत आतां.

**वेला**:–तुम्ही आतां स्वस्थ बसा पाहूं? तुम्ही करायचं तें कार्य उत्कृष्ट प्रकारें केलेलं आहे. आतां तुम्हीच करावं असं कांहीं राहिलेलं नाहीं.

**वैजयंती**:–आणि वैनी, तुम्ही कांहींहि न करतां आम्हां मुलांच्या नुसत्या नजरेपुढें राहिलां तरीहि पुष्कळ होणार आहे. आतां अगदीं स्वस्थ बसा तुम्ही वैनी. ( तिला हातास धरून एका खुर्चीवर बसविते. )

**वत्सला**:–अग पण चहा-तरी पाजवूं द्या कीं मला वल्लरीला.

**वल्लरी**:–( थर्मासमधील चहा ओतून घेऊन ) हा पहा मी चहा घेतला. आतां तरी झालं ना? बसायचं आतां जरासं स्वस्थपणीं. वीराताई, वेलादेवी नि वैजयंतीराजांना चहा–सरबत द्या ना करून कांहींतरी? स्वैपाकघरांत असेल सगळं.

**वीरा**:–आतां चहा–सरबताशिवायच तोंडं गोड झालीं आहेत. पण म्हणतीसच आहेस तर आणतें बापडी करून, चहा कीं सरबत, काय आणूं वेलादेवी आणि वैजयंतीराजे?

वैजयंती:-ए वात्रट, नाटक संपलं कीं आतां. देवी नि राजे जाऊं देत आपल्या वाटेनं, तुला काय हवं तें आण नाहींतर आणूं नको.

वत्सला:--नाटक ग कसलं वैजूताई !

वेला:-केलं होतं एक आम्ही वैनी. विदुषीचं वेड झाडून काढायसाठीं खटाटोप होता सारा. वीराताईच दिग्दर्शिका बरं का आमच्या नाटकाची !

विजया:-( लगबगीनें प्रवेश करते. तिच्या चर्येवर मुरदाडपणाचें हंसें असतें ) मगाची आपली थट्टा समजायची बरं का वल्लरीबाई. नाहींतर खरंच समजून दुख धरून बसाल. वर्षानुवर्ष जतन करून ठेवलेली प्रेम नि मैत्री संपुष्टांत यायची. नको ग बाई तें, कशाला केली मेली ती चेष्टा, असं झालं मला अन् तशी आलें परतून.

वत्सला:-तुमच्याहि तोंडावर पट्ट्या दिसतात विजयाबाई !

वेला:-वल्लरीबाईच्या फ्रेंडीण म्हणजे मैत्रीण आहेत त्या वैनी. बघा कशी जिव्हाळ्याची मैत्री आहे दोघींची ! दुखणीं सुद्धां दोघींना सारखीं !

वैजयंती:-( गाणें ) फिरफिरूनी ऽ ऽ छळसी कां ?

विजया:-अग बाई ! आपणाला ओळखलंच नाहीं मी !

वेला:-तुम्ही मला एकदम ओळखूं शकला नाहीं म्हणून तर नाटक छान रंगलं. तुमचा विदुषीपणा आम्हांला छान दिसून आला.

विजया:-हो, बरी आठवण झाली तुम्ही विदुषीपणा म्हणतांना. किनई वल्लरीबाई, आत्ताच मला ती वाघोलीकरीण नर्स भेटली दवाखान्यांत. ती म्हणत होती, माझ्या जागीं कनके वकीलाच्या बायकोला विदुषी-क्लबाची अध्यक्ष निवडून आणण्याचा घाट घातलाय म्हणे कांहीं फाजील बायकांनीं. आदितवारच्या वार्षिक सभेंतच यायचाय म्हणे ठराव. म्हणून सांगायला आलें मुद्दाम. तुमचं मत तर मला आहेच हुकमी, दुसऱ्या विघ्नसंतोषी बायकांचे कान उपटून त्यांनींहि मलाच मतं दिलीं पाहिजेत, ही कामगिरी मी तुमच्यावर सोंपवितें. वल्लरीबाई, मी घरीं गेल्यावर पैसे पाठवतें हं, किती शंभर नाहीं का? पुरतील ना तेवढे कीं सवाशें पाठवूं ?

वल्लरी:–मला दिडकीहि नकोय तुमची आतां आणि तुमच्या कर्जाच्या भाराखालीं दडपून जाऊन माझं मत विकणार नाहीं मी तुम्हांला. मी आदितवारच्या सभेंत मुळीं विदुषी–क्लब अजिबात मोडून टाकावा असा ठराव आणणार आहें.

( मोकळे डबे एकमेकांवर आपटत वीरा प्रवेश करते )

वीरा:–ही पहा विदुषी वल्लरीबाईच्या संसारांतील समृद्धि! चहाच्या डब्यांत चहा नाहीं. साखरेच्या डब्यांत साखरेचा पत्ता नाहीं! भाजीच्या टोपलींत लिंबू अदृश्य झालंय! बोला विदुषींनो, सरबत कशाचं करूं? चहा कशाचा बनवूं? आँ! विजयाबाई तुम्ही ती प्रतिज्ञा केल्यावर पुन्हां परत आलां या वल्लरीबाईचं तोंड पाहायला? बाकी आलां तेंच बरं झालं. आपल्या पट्टशिष्येची ही प्रपंचकुशलता म्हणजे तुमच्याहि विदुषीगिरीचा विजय आहे!

वत्सला:–वीराताई, शोभतो का ग तुला हा थिल्लरपणा? आपल्या घरांत कांहीं कमीपणा दिसलाच तर तो झाकून ठेवायचा का त्याचं असं जाहीर प्रदर्शन करायचं? तुझ्या वैनीला लोक हसले तरी तुलाहि लाज वाटायला हवी. एवढं सुद्धां ग कसं लक्षांत येत नाहीं तुझ्या? आणि बी. ए व्हायचीस आतां.

वीरा:–म्हणजे विदुषी झालेंच आहे कीं मी. माझा हा थिल्लर तमाशा विदुषीला साजेसाच आहे वैनी. होय कीं नाहीं विजयाबाई?

वत्सला:–मी मुळीच चालूं द्यायची नाहीं असलं. घरांतलं सामान सरलं असलं तरी वल्लरीबाईचं दुसरं घर आहे अजुन. आत्ता जाऊन आणतें काय हवं तें. चहा सरबतच का, पण शिरा चिवडाहि आणतें करून घटकेच्या आंत.

वल्लरी:–( उठून जाऊं लागते तिला बसवीत ) जाऊं नका तुम्ही बाई. वीराताई, माझी शोभा करताहेत तें अगदीं रास्त आहे.

वत्सलाः—वीराताई, तूंच जा नाहीं तर घरीं, आणि स्वयंपाकघराच्या कपाटांत वरच्या कप्यांत चहा साखरेचे भरलेले डबे आहेत ते घेऊन ये. अन् हें बघ, माजघरांत खोलींत मधल्या कोनाड्यांत एक शिसा आहे बघ तोंड बंद करून ठेवलेला, तोहि आण. एकादे वेळीं लिंबु मिळत नाहींत म्हणून स्वस्त मिळतात तेव्हां घेऊन रस काढून उकळून ठेवतें मी. छान रहातो वर्षानुवर्ष. तसंच देवघराच्या कमानींत संबळी आहे ना, तिच्यांत शंखजिऱ्याचा खडा असेल तोहि आण म्हणजे तुपांत उगाळून वल्लरीबाईच्या तोंडाच्या फोडांना लावतें. त्यानं कसं मऊ पडतं. विजयाबाईनाहि पडेल उपयोगी.

वेलाः—पाहिलीत वल्लरीबाई तुमच्या बिनशिकलेल्या जाऊबाईची संसारसिद्धता!

वीराः—दोन माणसांचा संसार, अन् वाण्याचं बिल मात्र महिना पन्नास नि साठ रुपयांचं! इतकं असून घर कोरडं ठणठणीत! पाहुणा आला कीं पळीव गड्यामोलकरणीला बाजारांत! पण आमच्या वैनीचं बघा. भाऊंच्या चाळीस रुपये पेन्शनींत ती आम्हा साऱ्यांना ओ होईपर्यंत खाऊं घालीत आली आहे. मध्यरात्रीं दहा पाहुणे आले तर दहा परोपरीचे जिन्नस करून घालील इतकी तिची अक्षय तयारी आहे. सुगरिणीचा हा आदर्श वस्तुपाठ तुझ्या डोळ्यापुढं असून विजयाबाईसारख्या प्रपंचमूर्ख विदुषी-मागून तूं लुब्रपणा करीत फिरलीस. विजयाबाई, स्पष्ट बोलतें, रागावूं नका. खोटं असलं तर मात्र खुशाल कान धरा माझा. तुमचे जज्जसाहेब महिन्या-महिन्यांत घरीं फिरकत नाहींत, त्यांचं दुसरीकडंच कुठं ठाणं असतं, ही गांवभर पसरलेली कंडी खोटी आहे का? तुमची मुलगी तुम्हाला दुरुत्तरं देते आणि तुमच्या मुलानं बाराव्या वर्षीच सीगारेटपर्यंत मजल मारली आहे हें नाकबूल करायची तुमची छाती आहे? नवऱ्याचं प्रेम अबाधित ठेवणं आणि मुलांचं आरोग्य आणि शील संभाळणं हें तुमचं कर्तव्य तुम्ही

केलंत ! 'होय' म्हणा वाटलं तर. तुम्ही मला फसवूं शकाल पण आपल्या मनाला मात्र तुम्ही कधीहि फसवूं शकणार नाहीं.

वत्सला:—वीराताई, बोलूं नये असं एखाद्याला लागण्यासारखं. दुसऱ्याचं काळेंबेरं कशाला काढावं आपण बाहेर ?

वैजयंती:—काय बिघडलं यांत वैनी ? विजयाबाईसारख्या विदुषी हे काळेंबेरं आपल्या गाफीलपणानं निर्माण करीत असतात आणि तें आपल्याच तोंडाला फासून घेतात. वैवाहिक कर्तव्यं कोणतीं हें समजून घेऊन तीं उत्तम प्रकारें पार पाडण्याचा प्रयत्न कां करूं नये यांनीं ? मी विदुषी आहे, तर अडाणी स्त्रियांनीं कित्ता घ्यावा असा संसार कां करून दाखवूं नये यांनी ? या आपला संसार तर नीट नाहींच करीत, पण वल्लरी-बाईसारख्या अर्धवट स्त्रिया गाठून यांच्या जन्माचेहि धिंडवडे करतात.

वेला:—आणि मी म्हणतें, या खरोखर समाजकार्य करतात असं धरलं, तरी यांनी संसारांत पडावंच कां पहिल्यांदा ? समाजसेवेसाठीं आपल्या विद्वत्तेचा आणि जीविताचा सद्व्यय करणाऱ्या स्त्रीला मी पायावर डोकं ठेवून नमस्कार करीन. पण धड समाजसेवा नाहीं, संसारहि धड नाहीं अशा बयाला ती बी. ए. च काय पण एम्. ए. असली तरी कुत्र्यामांजराइतकीहि किंमत देणार नाहीं.

वीरा:—मी सांगतें विजयाबाई तुमचं काय होतं तें. तुमच्या अंगांत निसर्गाची ओढ आवरण्याची धमक नसते आणि लोकसेवेची तळमळहि नसते. म्हणून तुम्ही कमी कष्टाचं वैवाहिक जीवन पतकरतां. तुमच्या सुशिक्षितपणाच्या जोरावर तुम्हाला पैसेवाला नवरा पटकावता येतो. तो पटकावला कीं आपली इतिकर्तव्यता झाली असं तुम्ही समजतां. त्यांच्या पैशाचा आणि मान्यतेचा उपयोग आपली प्रतिष्ठा वाढवून घेण्यापुरता तुम्ही करून घेत असतां. पण ज्याचा उपयोग तुम्ही करून घेतां त्याला तुमच्याकडून मोबदला काय मिळतो ? प्रेममय स्त्रीपुरुषांनीं नटलेलं आणि

गृहिणीच्या कुशल हातानं सजवलेलं आल्हाद–पूर्ण घर हवं असतं तें तुम्ही त्याला देतां का? तुमच्या घरांत पतीला रंजविणारी पत्नी, पत्नीवर अनुरक्त असणारा पती, बालकांना हसवणारी फुलवणारी आई आणि 'आई' म्हणून धावत येऊन तिच्या गळ्याला मिठी मारून पापा देणारीं बालकं हीं रमणीय दृश्यं कधीं दिसतात? खालीं मान कशाला घालतां? आमच्या वैनीच्या घरांत जाऊन बघा. भाऊ नि वैनी चांदण्यांत गोष्टी बोलताहेत. मुरली वैनीच्या मांडीवर डोकं ठेवून निजली आहे अन् माधव भाऊंची पाठ रगडतां रगडतां त्यांच्या गोष्टींत दंग झाला आहे. हा देखावा नजरेपुढें आणा. मी जन्मभर पाहातें आहे वैनीचं हें वैभव!

वल्लरी:–आणि आज येऊन पडलां आहांत माझ्या या करंट्या घरांत.

वत्सला:–बोलूं नये ग असं अभद्र. साऱ्या वेळा कांहीं सारख्या नसतात.

वंशी:–( सहर्ष नाचत वत्सलाबाईंच्या गळ्याला बिलगून ) वैनी, मुरलीताईनं बघ कशी वेणी घातलीय! अगदीं तुझ्यासारखी! आणि भाऊंनीं किनई ग पुजा करतां करतां हें फूल दिलं बघ वेणींत घालायला. ( वत्सलाबाई तिचे गाल कुरवाळून सानंद मुद्रेनें तिजकडे पाहात राहातात. )

वेला:–या सुखाला विदुषीच्या वेडामुळं अभागी आई मुकली.

विजया:–विदुषीची वाट चुकली, मग तिच्यामागून जाणाऱ्यांची वाट तरी कशी बरोबर राहणार? वीराताई, तुम्ही खरी विदुषी दाखवलीत आज आम्हांला. उपकार झाले तुमचे.

वल्लरी:–बाई, एक प्रार्थना आहे. नाहीं म्हणूं नका. तुम्ही सारींजणं इथंच या ना राहायला? मीं आतां घराबाहेर जायचं नाहीं असं ठरवलंय. मला विदुषी व्हायचं नाहीं कीं अप्टुडेट व्हायचं नाहीं. मला तुमच्यासारखं व्हायचंय. आजपर्यंत मीं तुम्हाला मानलं नाहीं, पाणउताराहि केला. सारं पोटांत घाला अन् या. याल?

वत्सला:—हो कां नाहीं येणार ! पण आम्ही पांच जणांनीं इथं येण्यापेक्षां तूं आणि वंशी दोघीच चला घरीं म्हणजे झालं. तूं बरी होईपर्यंत बापू येतील. अन् मग बघूं म्हणे काय करायचं तें. वीराताई बरोबर आहे कीं नाहीं हें ?

वीरा:—तुझं सगळं बरोबर असणारच वैनी. कारण दिखाऊ विदुषीपेक्षां टिकाऊ विदुषी आहेस तूं.

विठी:—( प्रवेश करून ) निघालं बाईसाब मावळणीच्या घशांत अडकल्यालं हाडुक.

वारणा:—( प्रवेश करून ) उगीच भिवबलन् मेल्यानं. म्हणे कावळा शिवला म्हणून 'आडांत पडून मेली' असं खोटं सांगितलं अशुभ टाळण्याकरतां. मग आलें धुम्मा पळत इकडं.

वल्लरी:—नसतां आलां तरी चाललं असतं. वारणाबाई, विठे, तुमच्या नोकरीची गरज नाहीं उरली आतां, आणि आतां कांहीं उरलंहि नाहीं घरांत पळवून नेण्याजोगं, तेव्हां जा बायांनों घरीं आपापल्या. आणि बघा दुसरी कुणी माझ्यासारखी अडाणी विदुषी सापडती आहे का शोधून.

विठी:—( वीरास ) तुम्ही सांगितलासां म्हणून क्येलं तर हें असं करून ठेवलासा व्हय ?

वारणा:—आणि तुझ्या नादानं मीहि फसलें. मेले विठे, आतां जायचं तरी कुठं ?

वीरा:—मठांत जा कीं महाराजांच्या. तिथेहि तोटा नसतो म्हणे सायसाखरेला.

वारणा:—पण आम्ही नेऊन दिल्याशिवाय तिथं काय असणार दगड ! कांहींतरी करा सोय ताईसाहेब गरीबांची.

वीरा:—हें बघा किनई, आमची नाटक मंडळी चालू राहिली असती तर घेतलं असतं तुम्हाला ठेवून. पण आमची मंडळीच मोडली हो.

वारणा:—मग आतां करूं तरी काय म्हणतें मी !

वीरा:—सांगितलं ना तुम्हाला वल्लरी वैनीनं कीं आंधळी विदुषी गाठून तिला लुबाडायला ? इथं आतां राहिली नाहीं हो कुणी तशी.

वेला:—आतां वल्लरीबाई खरोखरीच्या विदुषी होणार आहेत. जा तुम्ही.

वत्सला:—चला ग मुलींनो आतां सगळ्याजणी घरीं. सगळ्यांची अंगती पंगती करूया आपण.

वीरा:—नव्या विदुषीचं गोड उद्यापन.

वंशी:—अंगती पंगती बागेमध्यें करूया भोजन.

( हें गाणें म्हणूं लागते व पडदा सरकतो. )



**—संपूर्ण—**